


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# यंत्रसामुग्रीच्या अधिकाधिक कारखानदारांचीं

# विश्वसप्रिय

**किर्लोस्कर**

## डिझेल एंजिनें



टाइप एव्ही आणि जेव्ही
५ ते १५ हॉर्स पॉवर



टाइप बी २–२० ते २४ हॉर्स पॉवर











टाइप बी ४–४० ते ४८ हॉर्स पॉवर



टाइप आर ए, हवेनें थंड होणारी
१७ हॉर्स पॉवर ते ६४ हॉर्स पॉवर







देशांत तयार होणाऱ्या, पुढील कितीतरी प्रकारच्या यंत्रसामुग्रीच्या बाबतींत हमखास शक्ति पुरवठ्याचें साधन म्हणून किर्लोस्कर एंजिनें विश्वासास पात्र ठरलीं आहेत – काँक्रीट मिक्सर्स, कॉम्प्रेसर्स, टार मिक्सर्स, रोड रोलर्स, पंप, क्रशर्स, जनरेटर्स इत्यादि.

सर्वश्रेष्ठ दर्जा आणि कितीहि खडतर परिस्थितींत कोणत्याहि कटकटीवांचून उत्तम कामगिरी या त्यांच्या गुणांमुळें यंत्रसामुग्रीचे अधिकाधिक कारखानदार हीं एंजिनेंच प्रथम पसंत करतात.

**किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड,**

रजिस्टर्ड ऑफिस : एल्फिन्स्टन रोड, पुणें-३ (भारत)

TOM & BAT/KOEL/...


अनुक्रमणिका




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# दीपावली

साहित्य-कला-संस्कृति
जुलै : १९६४
वर्ष २० वें
मूल्य १ रु.

टे. नं. ७७७६५

Gram : DALALART

## श्रेयनामावलि—



**दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

※ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.
※ प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
● Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

## दीपावली

**दलाल आर्ट स्टूडिओ**
४२, केनडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२ **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# शांति अशांत झाली....

२७ **मे** चा दिवस उजाडला. इतर साऱ्या दिवसांसारखाच उजाडला–शांति–विश्वशांति–नेहमींप्रमाणें आपल्या कार्यांत मग्न होती. तिच्यापुढे चिंता नव्हत्या असें नाहीं. तिच्यापुढें सायप्रस, लाओस, मलेशिया, चीन, पाकिस्तानसारख्या चिंता होत्या. पण अधुनमधून, क्वचित लहान प्रमाणांत ठिणग्या उडाल्या तरी जगाला गिळून टाकणाऱ्या ज्वाला मात्र तिला दिसत नव्हत्या. सकाळीं उठून माणसांनाच खायला उठणाऱ्या माणसांच्याच ह्या जगाची चिंता करणें तिला प्राप्त होते.

दि. २७ मे ला ही ती अशीच उठली. आणि पहिलीच कळ तिच्या पाठींत आली. तिचा लाडका सुपुत्र अस्वस्थ झाला होता. जगाची चिंता वाहणारी एक मोठी शक्ति गलितगात्र झाली होती. 'युद्ध नको' म्हणून साऱ्या सुशिक्षित आणि सुसंस्कृत जगाला ओरडून आरडून बजावणारी एक मोठी नैतिक शक्ति शून्यवत् होऊं घातली होती. साम्राज्यलालसा, अभिलाषा, वर्णविव्देष, जाति-धर्म व्देष यापायीं बेशुध्दींत वावरणाऱ्या जगाला शुध्दीवर राखण्याची कांक्षा बाळगणारा महापुरुषच बेशुध्द झाला होता. जग नेहमींच सचेतन रहावें. प्रगतिशील रहावें, हंसणारें, फुलणारें रहावें म्हणून मनोमन प्रार्थना करणाऱ्या माणसाची चेतनाच संपत आली होती. 'शांति' म्हणत जगाला 'जीवना'चा प्रकाश देणाऱ्याचा दीप विझत चालला होता. अखेर होणार होतें काय? अदृष्टांत काय होते ? भवितव्यता काय वाढून आणीत होतीं ? आनंदानें आकाशांत उडत येणारी शांतिदूत कबुतरें आज गप्प कां होतीं ? शांतीचा जयजयकार आज थांबला कां होता ? कां ? कशासाठीं ?

शांति प्रश्न विचारीत होती आणि कालपुरुष उत्तर देत होता. घटका गेली. पळें गेलीं. तासही ठणाणले आणि दोन वाजून पंधरा मिनिटांनीं कालपुरुषानें एक भयानक किंचाळी फोडली. भयानक आक्रोश करीत कबुतरें आकाशांत उडालीं. गुलाबाच्या पाकळया गळून पडल्या. सुगंध सर्वत्र दरवळला. महापुरुषाची मान कलंडली आणि शांतीनें आपली मान खालीं घातली. तिला रडूं येत होतें. पण रडतां येत नव्हते. शोकावेग आवरत नव्हता. पण आवरणें भाग पडत होतें. सांत्वन करण्याची क्षमता सरली होती. पण सांत्वनासाठीं दोन्हीं हात उंच उभे ठेवणें भाग होतें. कारण शांतीला रडून चालणार नव्हते. सांत्वनाची क्षमता गमावून चालणार नव्हते. कारण तीच तर जगाची तारकशक्ति होती. तीच तर स्थिति आणि लय यांतली सीमारेषा होती. विध्वंस आणि विकास, जन्म आणि मृत्यु, प्रगति आणि परागति यांतला सुवर्णमध्य ती होती. ती होती म्हणून तर माणसांतल्या पशूला ह्या कणवेनें भरलेल्या, मृदुतेनें भरलेल्या, सौंदर्यानें नटलेल्या मांगल्याचें मानघन असलेल्या, साधुतेनें सामान्यालाही प्रकाशरूप होणाऱ्या नराचा नारायण करण्याची किमया घडवूं शकणाऱ्या जगांत मोकाट हिंडतां येत नव्हते. "हात उचललास तर हातच जाळून टाकीन" म्हणण्याचें सामर्थ्य त्या शांतींत होतें. आणि म्हणूनच शांतीला शांत राहणेंच भाग होते. कारण साऱ्या सुसंस्कृत, प्रगत आणि जीवनाकांक्षा बाळगणाऱ्या जगाची ती अधिष्टात्री होती. तिची सेवा करणारे महापुरुष युगें युगें जन्मत होते आणि काळाच्या क्रीडेनें पुन्हां पुन्हां त्यांची मातीही होत होती. क्वचित त्या मंत्राचें नांव होतें ख्रिस्त तर क्वचित होतें बुद्ध ? संतांच्या अंतःकरणांत कधीं तिनें आकार घेतला तर कधीं गांधीं नेहरूंसारख्या राजकारण्यांच्या ! नांवें कांहींही असलीं, धर्माचें


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

नांव कांहींही असलें, कुणी कोणतीही जात सांगितली असली तरी शांतीचें नांव होतें एकच! "शांति" हेंच!! युगामागून युगें लोटलीं–पुजारी भेटले, भक्त भेटले, पाईक भेटले, प्रचारक भेटले. पूजेचें माध्यम बदललें. पूजा द्रव्येंही कधीं बदललीं. पूजेचा देव्हाराही कधीं कधीं सोयीनुसार हलला. पण पूजा चालूंच राहिली. मंत्रांचें गायन अभंगच राहिलें. तरीही पण —

"जमेचि ना, वनेचि ना, घडेचि ना"

असेंच तिला सतत म्हणत रहावें लागलें आहे. कारण मानव जसा जसा विज्ञानाच्या सहाय्यानें जीवन सुसह्य करण्याची धडपड करतो आहे, तसाच तो विज्ञानाच्याच सहाय्यानें विध्वंसाच्याही जवळ जाऊन उभा आहे. कधीं नव्हे ती चिंता त्यामुळेंच शांतीला वाटूं लागली होती. पुन्हां पुन्हां माणूस 'युध्दाची झिंग' पीत होता–आणि नेहरूंच्या नांवानें तर कधीं रसेलच्या नांवानें तर कधीं दुसरें एखादें नांव घेऊन शांति त्यांना शुध्दीवर आणण्याचा प्रयत्न करीत होती. आपणच शोधलेलीं अस्त्रें किती आपल्यालाच मारक आहेत याची त्याला जाग येऊं लागली होती. एक नवी शुद्ध त्याला येत होती. नवी दृष्टि त्याला मिळूं लागली होती. विश्वासाच्या, सहजीवनाच्या सिद्धांतावरची त्याची श्रद्धा वाढूं लागली होती. जागतिक विध्वंसाच्या सीमेवरून तो वारंवार परतत होता. कधीं क्युबांतून तर कधीं नेफांतून तर कधीं सायप्रस-लाओसमधून! पुन्हां पुन्हां झिंग येतच होती. माणूस पडतच होता. आणि शांति त्यांना सांवरण्याचा प्रयत्न करीतच होती.

पण—

विश्वावर प्रेम करणारा, विश्व कुटुंबाचीं स्वप्नें पाहणारा, विश्वमानवाची कल्पना पेलूं शकणारा तिचा सुपुत्रच कोसळला. एक चैतन्य अचेतन झालें. एका सुवर्णाची माती झाली. "नेत्रसुख, स्पर्शसुख, गंधसुख देणारें फूल कोमेजलें–मातींत मिसळून गेलें. केनेडी गेले तेव्हांही शांति अशीच रडली. आणि नेहरूंच्या मृत्यूनें तर तिला फारच मोठा फटका दिला. 'जमेचि ना' म्हणत म्हणतच तिचा प्रयत्न चालूं होता–आहे–राहीलही! कारण 'विनाशाची झिंग' हा एक विकार आहे तर 'शांति' हें एक सत्य आहे. अविनाशी, मंगल, तारक आणि प्रेरक असें सत्य आहे. तें सत्य सांगणारा तिचा प्रवक्ता मूक झाला म्हणून शांति अशांत झाली आहे. तें सत्य पेलणारी 'शक्ति' मृण्मय झाली म्हणून शांति आज अशांत झाली आहे. माणसांतल्या साधुतेवर श्रध्दा असणारें 'नेहरू' नामक एक स्वप्न विरून गेलें आहे म्हणून शांति आज अशांत झाली आहे––अखेर शांतीची ही वेदना आम्ही जाणून घेऊं शकूं काय?

●●●



युगानुयुगें हा सुगंध दरवळत राहील.

## उत्तर--दिग्विजय

**श्री. पु. भा. भावे यांच्या तेजस्वी लेखणींतून उतरलेला भावस्पर्शी वृत्तान्त आपण 'दीपावली' च्या मे ६४ अंकांत वाचलात. या प्रवासवर्णनाचा दुसरा हप्ता चालू अंकांत प्रसिद्ध होणार होता; परंतु कांहीं अपरिहार्य कारणानें या अंकांत प्रसिद्ध होऊं शकला नाहीं तो पुढील व यापुढें दर अंकांत प्रसिद्ध होईल.**

**—संपादक**







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# लोकनेता राज्यकर्ता आणि माणूस

लेखक—पां. वा. गाडगीळ



*नेहरू हे फार लोकोत्तर असे राष्ट्रीय व जागतिक महापुरुष झाले. ते धर्म न मानणारे धार्मिक महापुरुष होते. बुद्धाचा निर्वैरत्वाचा संदेश त्यांनीं जगाला दिला व व्यवहारांत यशस्वी करून दाखविला. पण त्यांचें हें सारे यश नेहरू हे एक श्रेष्ठ व्यक्ति, एक श्रेष्ठ माणूस, या नात्यानें त्यांनीं मिळविलें. जगाला अनेकदां महायुद्धापासून वांचवून वैरापेक्षां स्नेह व सहकार्य हें अधिक श्रेष्ठ मूल्य होय हें त्यांनीं जगाला पटविलें. पण हें त्यांचें एक माणूस या नात्यानेंच यश होय.*

*नेहरूंना अफाट लोकप्रियता लाभली. पण लोकनेता व राज्यकर्ता या नात्यानें ते लायक ठरले नाहींत व फार अयशस्वी झाले.*

**कामं नृपाः संतु सहस्रशोऽन्ये**
**राजन्वती माहुरनेन भूमिम् ।**
**नक्षत्रताराग्रहसंकुलाऽपि**
**ज्योतिष्मती चंद्रम सैव रात्रिः॥**
**—रघुवंश**

[भावार्थ इतर हजारों राजे असोतहि, पण या भूमीला राजा आहे असे म्हणतात ते या राजामुळें ! रजनीच्या अंगावर नक्षत्रें, तारे आणि ग्रह हीं रत्नें खचून भरलीं असलीं तरी रजनी मुखावर जें तेज झळकतें तें रजनी-नाथामुळें !]

पं. नेहरूंच्या मृत्यूनंतर मी त्यांच्याविषयीं तावडतोब जो लेख लिहिला तो वर दिलेली कालिदासाची उक्ति घालून लिहायला हवा होता अशी एका ललित साहित्यिक मित्रानें माझ्याकडे तक्रार केली. नेहरूंच्या मृत्यूची बातमी मला अचानक कळली. त्यानंतर पांच दहा मिनिटांत मी लिहायला बसलों. मनाला खिन्नताही आली होती. वरील श्लोक एकदां मनांत येऊन गेलाही. पण नेहरूंच्या जीवनांतील वादग्रस्त भागा-कडेच मनानें प्रथम झेप घेतली. त्यांत त्यांची थोरवी मांडता आली तेवढी मांडल्यावर वरीलसारखा श्लोक हातीं धरून वैयक्तिक गौरवात्मक असें कांहीं लिहिण्याची लहर लागलीच नाहीं.

नंतर दोन दिवसांनी लिहिलेल्या आणखी एका मोठ्या लेखांत नेहरूंच्या कर्तृत्वाची प्रेरणा बुद्धापासूनची कशी आहे हें सांग-ण्यांतच माझें मन रमलें आणि नेहरूंच्या अलोट लोकप्रियतेवर वरीलसारखा श्लोक घेऊन गौरवात्मक लिहिण्याचा उत्साह वाटला नाहीं. तरी पण वरीलसारखा श्लोक हातीं घेऊन नेहरूंच्या लोकप्रियतेच्या गौरव-पर लिहिण्याची इच्छा मला मुळींही कां होत नाहीं याचा विचार जरा शांत चित्तानें केला आणि असे गौरवपर लिहिणें मला जमणार



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

नाहीं, हें माझ्या लक्षांत आलें.

कवि कुलगुरूंच्या वरील श्लोकांत जी एक गोष्ट गृहीत आहे ती ही कीं, त्यानें वर्णिलेला रघुराजा अफाट लोकप्रिय होता. समाजांतील सर्व वर्गांत त्याच्याबद्दल आदर व पसंती होती. प्रांजळपणें बोलायचें तर नेहरू संबंधानें असें म्हणतां येईल कां ? बहुसंख्य जनतेनें नेहरूंवर अलोट प्रेम केले हें खरेंच आहे. पण प्राचीन राजाची लोकप्रियता व आजच्या पुढाऱ्याची लोकप्रियता यांचें मूल्यमापन वेगळ्या वेगळ्या मापानें केलें पाहिजे. प्राचीन राजावर जनतेनें भावडे प्रेम केलें व वरीष्ठ आणि सुशिक्षित वर्गानीं त्या राजाच्या दराऱ्यानें भिऊन त्याची खुशामत केली तरी पुरे असे. पण आज सुशिक्षित जनतेचा तीव्र बौद्धिक विरोध ज्या पुढाऱ्याला असेल त्यावर प्रचंड जनतेचें भावडे प्रेम असलें तर त्यांत त्या पुढाऱ्यानें व त्याच्या चाहत्यानें समाधान मानूं नये. आणि महाराष्ट्रांतील व परप्रांतांतीलही मध्यम वर्गानें नेहरूंच्या जवळजवळ सर्व धोरणास गेल्या कांहीं वर्षांत अगदीं विद्वेषानें विरोध केला याचा विषाद माझ्या मनाला इतका झाला आहे कीं त्यापुढें असंख्य जनतेनें नेहरूंवर केलेल्या भावड्या प्रेमाची मातब्बरी मला फारशी वाटली नाहीं.

गेल्या कांहीं वर्षांत ज्यांनीं नेहरूंविरुद्ध सडकून लिहिले, नेहरू हे सत्तालोभी आहेत. आपल्या मुलीला आपली गादी मिळावी म्हणून डावपेंच खेळत आहेत असें कुत्सित लिहिण्यासहि ज्यांनीं कमी केलें नाहीं अशा कांहीं लेखकांनीं नेहरू अचानक वारल्यामुळें शोकरसात्मक मृत्यूलेख लिहिले, त्यासाठीं डोळ्यांत कांद्याचा रस घालून अश्रुपात केला, प्राणायामानें घसा दाटून आणला, थोडेंसे 'जलपान' करून डोकें बधीर करून घेतलें. गेल्या आठवड्यांत अशा कृत्रिम रडचांनीं महाराष्ट्रांत नाले, ओढे, नद्या वाहल्या आहेत. त्या लवकरच शुष्क होतील. आणि नेहरू हळूंहळूं तुच्छतापूर्वक मागें पडतील, विसरले जातील. येथेंच नेहरूंच्या चाहत्यांचें एक कर्तव्य आहे.

माझ्या मतें नेहरूंचें चरित्र, त्यांचीं धोरणें, त्यांचें तत्त्वज्ञान, यांची थोरवी अशी आहे कीं, त्यांचें चिंतन, मनन पुढील पन्नास वर्षें तरी भारतानें व जगानें केलें पाहिजे. जनतेनें नेहरूंवर भावडें प्रेम केलें यामुळें कॉंग्रेसला चुका करूनही भरघोस निवडणुकी जिंकतां आल्या एवढेंच त्या भावड्या प्रेमाचें ऐतिहासिक महत्त्व राहील. उलट सुशिक्षित मध्यमवर्गानें नेहरूंच्या धोरणाचें सूक्ष्म अवलोकन केलें नाहीं, त्याचें त्याला आकलन झालें नाहीं. आतां ज्यांनीं 'निवडणूक यशदाता' म्हणून नेहरूंवर 'हिशेबी' प्रेम केलें, अथवा ज्यांनीं त्याचा सरळ सरळ तिरस्कार व द्वेषच केला असे लोक कदाचित लोकांच्या भावड्या नेहरूप्रेमाचा फायदा घेऊन लोकप्रियता मिळवण्यासाठीं नेहरूंना मान्य नसणाऱ्या गोष्टीही त्यांच्या धोरणांत बसवतील व आपल्या स्वार्थासाठीं नेहरूंच्या लोकप्रियतेची लूट करतील असा इषारा नेहरूंच्या मृत्यूनंतर पाठविलेल्या दुखवट्याच्या संदेशांत बर्ट्रंड रसेल यांनीं दिला आहे. ही लूट जर टाळायची असेल तर नेहरूंच्या मृत्यूनंतर नेहरूंच्या तत्त्वज्ञानाचें व धोरणाचें दर्शन लोकांपुढें सतत मांडणें व नेहरू विचारांच्या अभ्यासाचें लोकांना आवाहन करणें हे नेहरूवाद्यांचें मुख्य कर्तव्य आहे.

नेहरूंचें सारें धोरण चुकलें असें मानणाऱ्यांचा सुशिक्षितांत फार मोठा भरणा असून हिमालयावर चीननें आक्रमण करून भारतीय सैन्याचा मोठा पराभव केला—'तेव्हां हिमालयावरच नेहरू खरोखर मेले' असे अनेक 'विचारवंतां'चें मत आहे. हिमालयावरील पराभवाच्या वेळीं या 'विचारवंतां'ची संख्या इतकी वाढली कीं, रशियानें चीनला मागें खेचलें नसते तर मेननच्या पाठोपाठ नेहरूंचाही पाडाव झाला असता. त्यावेळीं जगांत व भारतांत नेहरूंची छीः थूः पुष्कळच झाली. पण त्यानंतरच्या काळांत एक अजब चमत्कार घडला. भारतावरील चीनच्या आक्रमणामुळेंच, रशिया व चीन यांचें मूळचें प्रच्छन्न वैर चव्हाटयावर आलें. आतां तें इतकें वाढलें आहे कीं, रशिया चीन विरुद्ध भारताच्या बाजूनें बोलूं लागला असून अमेरिका काश्मिरच्या लोभानें पाकिस्तान मार्फत भारताचा छळ करीत असतां काश्मीर प्रश्नांत रशियानें गेलीं दहा वर्षें सतत भारताला पाठिंबा दिला आहे.

नेहरूंनी चीन व रशिया यांचें भांडण आपल्या कुटिल नीतीनें लावलें असा आरोप माओ नेहरूंवर करीत आहे तर "नेहरूंची रशिया मैत्री हा एक मूर्खपणा असून अखेर रशिया व चीन हे भारताविरुद्ध एकजूट होतील व भारताला कम्युनिस्ट परचक्राविरुद्ध अमेरिकेचेंच साहाय्य घ्यावें लागेल" असें नेहरूंना कित्येक वर्षें बजावून नेहरूंच्या नाकांत काड्या घालणाऱ्यांना रशिया चीनविरुद्ध भारताची बाजू घेत आहे व अमेरिका पाकिस्तानला भारताविरुद्ध पाठिंबा देत असून भारताविरुद्ध पाकिस्तान चीन–मैत्री होत असतांही अमेरिका त्या गोष्टीस विरोध करीत नाहीं हें सर्व पाहून निर्बुद्ध, बावळटासारखा चेहरा करून बसावें लागलें आहे. कुटिल नीति आणि 'शठं प्रति-शाठ्यं', 'आपल्या शत्रूचा शत्रु तो आपला मित्र' असले परराष्ट्र धोरणाचे मंत्र नेहरूंना कळत नाहींत, म्हणून नेहरूंना जे मूर्ख व नालायक मानत होते त्यांना नेहरूंनीं माओलाही आपल्या कुटिल नीतीनें फसविलें अशी विलंदरांचा शिरोमणी असलेल्या माओचीच खात्री झाल्याचें पाहून आश्चर्यानें बुचकळ्यांत पडल्यासारखें झालें आहे.

चीननें भारताचा हिमालयावर केलेला पराभव हा जर नेहरूंचा पराभव असेल तर चीनविरुद्ध व अमेरिकेच्या काश्मीर धोरणाविरुद्ध भारताला रशियाची मिळालेली वाढती दृढ मैत्री हा नेहरूंचा फार मोठा विजय असें कां म्हणूं नये असा प्रश्न नेहरूंच्या प्रखर टीकाकारांचेंही मन अलीकडे त्यांनाच विचारूं लागलें होतें. यामुळें नेहरूविरोधी टीका अलीकडे कांहींशी सौम्य झाली होती, तोंच नेहरू मृत्यु पावले व त्यांच्या मृत्यूमुळें मतभेदांना थोडा काळ सुटी मिळाल्यासारखें झाले आहे. नेहरूंच्या मृत्यूमुळें आतां यापुढें त्यांचें कर्तृत्व म्हणून कांहींही घडणार नाहीं. पण नेहरू विसरले जाणे अथवा उलट त्यांच्या धोरणाविषयीं गैरसमज या दोन्ही गोष्टी राहणें परिणामी फार वाईट ठरतील. उदाहरणार्थ चीन व रशिया यांचें नेहरूंनीं भांडण लावून



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

रशियाला चीनविरुद्ध आपल्या बाजूस खेंचलें यांत नेहरूंनी कुटिल नीति कौशल्य दाखविलें म्हणून पुढील काळांत जर नेहरूंचा कोणी गौरव करील तर बर्ट्रंड रसेल यांनी सूचित केल्याप्रमाणें तो नेहरूंवर भावी इतिहासानें फार मोठा सूड घेतल्यासारखे होईल.

खरोखर नेहरू-रशिया संबंध हा नेहरू तत्त्वज्ञानाचा व नेहरूंच्या मुत्सद्देगिरीचा गाभाच आहे. शेजाऱ्यावर प्रेम करा, 'शत्रूचाही द्वेष करूं नका', 'माणूस अज्ञानानें पाप करतो, त्याला क्षमाबुद्धीनें वागवून पुण्यमार्ग शिकविला पाहिजे' ही ख्रिस्ताची दोन हजार वर्षांपूर्वीची शिकवणूक आजच्या शास्त्रीय युगांत व्यवहार्य व अपरिहार्य ठरली आहे असें बर्नार्ड शॉ परोपरीनें सांगतो. बुद्धाचें निर्वैरत्वाचें तत्त्वज्ञान नेहरूंनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय व्यवहारांत आचरून व यशस्वी करून दाखविलें आणि रशियाचे बाबतींत नेहरूंच्या या धोरणास जास्तीत जास्त यश आलें.

१९४९ सालीं सप्टेंबरमध्यें नेहरू अमेरिकेस गेले व तेथें त्यांचीं अनेक व्याख्यानें झालीं. त्यावेळीं बर्लिनच्या प्रश्नावर कम्युनिस्ट रशिया व अमेरिका यांच्यांत हाडवैर माजलें होतें व नेहरूंनीं अमेरिकेंतल्या व्याख्यानांत अमेरिकेची बाजू घ्यावी असें दडपण नेहरूंवर आलें होतें. नेहरूंना रशियाबद्दल खास प्रेम वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. कारण मॉस्को रेडिओ नेहरूंविरुद्ध विषारी प्रचार करीत होता आणि भारतांतील कम्युनिस्ट पक्ष भारतात क्रांति करून नेहरूंचा चँग कै शेक करण्याची प्रतिज्ञा करीत होता. अशाही परिस्थितींत केवळ मुत्सद्देगिरीसाठीं रशियाला दुखवूं नये एवढीच भूमिका नेहरूंना घ्यायची असती तर रशियाबद्दल व कम्युनिझमबद्दल मौन राखून लोकशाहीबद्दल गोड गोड गौरवोद्गार त्यांना काढतां आले असते आणि त्याबद्दल अमेरिकेची शाबासकी मिळवितां आली असती. पण नेहरूंनी अमेरिकेंतल्या व्याख्यानांत अगदीं उच्च अशी बुद्धाची निर्वैरत्वाची भूमिका घेतली. "आजच्या ॲटॉमिक जगांत कोणत्याही कारणानें राष्ट्राराष्ट्रांचें युद्ध झाले तर त्यांत कोणाचाही विजय न होतां दोन्हीं पक्षांचा व त्याबरोबर साऱ्या जगाचा विध्वंसच होईल म्हणून कोणतेही वाद युद्धांवाचून वाटाघाटींनीं सोडवावे आणि लोकशाही राष्ट्रें व कम्युनिस्ट राष्ट्रें यांनीं सहजीवनानें जगांत नांदावे" या मताचा अमेरिकेंतील आपल्या व्याख्यानांत आग्रहानें प्रचार केला. अमेरिकन लोकांना या उपदेशाचा राग आला. ख्रिस्ताप्रमाणें अत्युच्च उपदेशकाच्या ऐटीनें नेहरू बोलत आहेत असे म्हणून अमेरिकनांनी त्यांची निर्भत्सना केली. आणि उलट रशियाला नेहरूंच्या या विचारांत प्रामाणिकपणा कांहींच दिसला नाहीं.

पण पुढें कोरियन युद्धांत नेहरूंच्या उपदेशाची कसोटी लागली. कोरियन युद्धांत उत्तर कोरियाच्या बाजूनें चीननें उडी घेतल्यावर अँग्लो-अमेरिकनांना तें युद्ध ॲटमबाँबवाचून जिंकता येणार नाहीं व ॲटमबाँब वापरला तर रशिया युद्धांत येऊन साऱ्या पश्चिमी जगाची होळी होईल ही गोष्ट अँग्लो-अमेरिकनांच्या लक्षांत आली. उलट रशियाला असे ॲटॉमिक युद्ध नको होतें. पण हा युद्धाचा अंतिम धोका लक्षांत येण्याला दोन्ही बाजूंना कांहीं महिने लागले. आणि नेहरूंनी केलेल्या सूचनेमुळेंच रशिया व अँग्लोअमेरिकन्स यांना आत्मनिरीक्षणाची प्रेरणा मिळाली.

कोरियन युद्ध सुरूं झालें तेव्हां कम्युनिस्ट उत्तर कोरियानें दक्षिण कोरियावर अन्याय्य आक्रमण केलें ही गोष्ट नेहरूंनीं मान्य केली. पण उत्तर कोरियाचें आक्रमण मागें हटविल्यावर आक्रमकाचा संपूर्ण पराभव करण्याचा आग्रह सोडून देऊन तह करावा व वादग्रस्त प्रश्न वाटाघाटींनें सोडवावे असें नेहरूंनीं सुचविलें. रशियानें नेहरूंच्या या योजनेस संमति दिली. पण आक्रमकाला शासन न करतां युद्ध थांबवावें व उलट आक्रमकांशीं वाटाघाटी कराव्या यांत अँग्लो-अमेरिकनांना अपमान वाटला व त्यांनीं युद्ध पुढें चालविलें. शेवटीं लाल चीन युद्धांत आल्यामुळें आपला युद्धांत निभाव लागणार नाहीं हे अँग्लो-अमेरिकनांच्या लक्षांत येऊन त्यांनीं नेहरूंच्या सूचनेनुसार युद्ध थांबविलें.

नेहरूंच्या सहजीवन तत्त्वाचा हा मोठा विजय होता. यानंतर मॉस्को रेडिओवरून नेहरूंची निंदा होण्याचें थांबलें व नेहरूंची प्रशंसा सुरूं झाली. १९५४ सालीं इंडोचीनमध्यें कोरियन युद्धाचीच परिस्थिती उत्पन्न झाली व त्या युद्धाचाहि तसाच शेवट नेहरूंच्या सांगण्यावरूनच झाला. या दोन्ही प्रसंगीं नेहरूंनीं जागतिक युद्ध टाळून जगाला वांचविले असा अभिप्राय बर्ट्रंड रसेलसारख्या तत्त्ववेत्त्यांनीं दिला आहे यांत नेहरूंचा मुख्य हेतु जागतिक युद्ध टाळणें हा जसा होता तसाच आशिया व भारत येथें युद्धाचें रणांगण भडकूं नये व या मागासलेल्या राष्ट्रांना आर्थिक व सांस्कृतिक विकासासाठीं संधी मिळावी हाही होता.

कम्युनिस्ट रशिया व कम्युनिस्ट चीन एकजूट होऊन भारतातली लोकशाही नष्ट करतील व भारताला आणि साऱ्या आशियाला गिळून टाकतील हें संकट टाळण्यासाठीं भारतानें अमेरिकेशीं शस्त्रास्त्र साहाय्याचा करार करावा अशी सूचना भारतांत व अमेरिकेंत अनेकांनीं केली. पण नेहरूंनीं कोणत्याही शस्त्रास्त्र साहाय्याच्या कराराला विरोध केला. शस्त्रास्त्र साहाय्याच्या करारामुळें वातावरणांत वैरभाव भडकत जाऊन युद्धें अपरिहार्य होईल व युद्धांत कोणाचाच बचाव होणार नाहीं म्हणून युद्ध टाळण्याचें धोरण हेंच महत्त्वाचें होय असे ठरवून नेहरूंनीं रशिया व चीन या दोघांशीं मैत्री केली व अमेरिकेशीही मित्रभाव कायम ठेविला. त्याबरोबर अमेरिका व रशिया या दोघांनाही युद्ध नको आहे अशी आपली खात्री असल्याचें जगाला सांगून या दोन्हीं राष्ट्रांनीं सहजीवनाचा निर्धार करावा अशी हांक नेहरूंनीं दिली. या प्रचारामुळें अमेरिका व पश्चिमी राष्ट्रें आणि सोव्हिएट रशिया यांतील जनतेला अत्यानंद होऊन नेहरू हा युद्ध टाळणारा प्रेषित आहे अशी या सर्व जगाची खात्री झाली. या प्रचारांतही नेहरूंची मुत्सद्देगिरीच केवळ नसून तत्त्वनिष्ठा होती.

आशियांत रशियाला शह देतां यावा यासाठीं अमेरिकेला काश्मीर हवें होतें व पाकिस्तानमार्फत अमेरिका काश्मीर घेऊं

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पहात होती. त्यासाठीं गेल्या दहा वर्षांत अमेरिकेनें पाकिस्तानला शस्त्रें पुरवून भारताचा क्रूरपणें छळ केला. पाकिस्ताननें वैरभावनेची मोहीम कमालीची केली. पाकिस्तानांतील हिंदूंचा अनन्वित छळ केला व भारतांतल्या मुसलमानांना भारत सरकार-विरुद्ध उठाव करण्याची अनेकदां चिथावणी दिली. पण नेहरूंनी पाकिस्तानच्या वैर प्रचाराबद्दल येथल्या मुसलमानांना दुखविलें नाहीं अथवा पाकिस्तान आणि अमेरिका यांच्याशीं समजुतीचीं बोलणीं केलीं तरी त्यांच्या विरुद्ध प्रचार केला नाहीं. उलट काश्मीर पाकिस्तानला देण्याचें मात्र साफ नाकारलें. या नेहरूंच्या दुहेरी धोरणाचा रशियावर फार चांगला परिणाम झाला. रशियाला युद्ध नको होतें. पण कम्युनिस्ट-चीन कोरिया इंडोचीन वगैरे क्षेत्रांत अमेरिकेच्या कुरापती काढून आशियांत युद्धाचें वातावरण भडकवीत होता. उलट नेहरूंनी कोरिया व इंडो-चीन येथें युद्ध शमविण्यांत पुढाकार घेऊन युद्ध थांबविलें. इतकेंच नव्हे तर पाकिस्तान अमेरिकेच्या शस्त्रास्त्र साहाय्यानें व चिथावणीनें भारताविरुद्ध वैर प्रचार करीत असतांही नेहरूंनी निर्वैरत्वाची व सहनशीलतेची भूमिका घेऊन शांततेचें वातावरण सांभाळलें आणि त्याच बरोबर काश्मीर पाकिस्तानला देण्याचें सतत नाकारून रशियाला शह देणारा अमेरिकेचा युद्धतळ तेथें येण्याचें टाळलें.

यामुळें आशियांत युद्ध जर टाळायचें असेल तर चीनपेक्षां भारताशींच रशियानें अधिक दृढ मैत्री केली पाहिजे अशी १९५६–५७ पासूनच्या काळांत रशियाची खात्री होत गेली. तसेंच चीनचा कम्युनिझम बलवान झाल्यास तो तिसरें महायुद्ध करील, उलट भारताची लोकशाही बलवान झाल्यास नेहरू भारताचा बचाव करून शिवाय तिसरें महायुद्ध टाळण्याला मदत करतील असाही रशियाला भारताबद्दल विश्वास वाटूं लागला म्हणून चीनला मदत करण्याचें रशियानें हळूहळूं थांबविलें व भारताला वाढती मदत सुरू केली.

१९५० सालीं चीननें तिबेटवर आक्रमण केलें तेव्हांपासूनच भारताला चीनपासून



## महा निर्याण

महातेजाचे प्रतीक
तेजाळतां मंदावले
मंदावता निमाले
त्रिखंड धुंडुनि आलेल्या
शांतिदूताचे पाय थंडावले

☆ ☆ ☆

नियतीचा निसर्ग हबकला
मृत्युराजही इथें थबकला.
—जवाहरलाल—जवाहरलाल !
मृत्यूचे अमर डोळेही देऊन ताण
बघत राहिले खिन्नपणें
भारताच्या नव्हे जगताच्या
प्राणाचे महानिर्याण !

☆ ☆ ☆

भक्तिभावानें बद्ध झालेलीं
श्रद्धेय अंतःकरणें
बुडालीं शोक सागरांत
श्रद्धांजलींच्या फुलांसवे त्यांत
गंहिवरले यमुनेचे तीर
उठला निनाद धीर गंभीर
सत्य अहिंसेच्या घरीं
विश्व शांति आली
या शांति घाटावर
जिवाशिवाची भेट झाली !

—सोपानदेव चौधरी

भीति आहे हें नेहरूंच्या लक्षांत आलें होतें. पण म्हणून अमेरिकेची शस्त्रास्त्र मदत घेऊन ठेवायची तर आशियांत 'कोल्ड वॉर' ऊर्फ तणातणी वाढून रशिया व चीन यांची एकजूट वाढणार, युद्धाचा धाक वाढून शस्त्रास्त्र खर्च वाढणार व विकासकार्य थांबणार अशी नेहरूंना भीति वाटली. उलट रशियाला युद्ध नको आहे याबाबत नेहरूंना खात्री असल्यानें रशियाशी स्नेह ठेवला तर रशिया चीनबरोबर युद्धासाठीं एकजूट होण्याऐवजीं चीनला युद्धापासून मागें खेचून ठेवील असा नेहरूंचा १९५४ पासून तरी कयास होता असें माझें तेव्हांपासूनचें मत आहे.

चीननें लडाखवर आक्रमण केलें तें रशियानें अडविलें नाहीं याचीं कारणें दोन. एकतर अमेरिकेशीं १९५७–५८ पासून रशियाची तेढ वाढली होती. रशिया स्वतःच पेचांत होता. शिवाय लडाखवरील आक्रमणानें भारताच्या अंतःप्रदेशाला तात्कालिक धोका नसून अमेरिकेकडून हात मोकळा होतांच रशिया लडाखबाबत कांहीं तडजोड घडवून आणील असा संभव होता. चीनची तिबेटांतील जय्यत लष्करी तयारी व लडाखवरील आक्रमण हें रशियाच्या सैबेरियाला धोक्याचें होते म्हणून फार काळ चीनची उपेक्षा रशिया करूं शकणार नाहीं असाही नेहरूंचा अंदाज असावा. म्हणून चीनला भारतावर रशिया मोठें आक्रमण करूं देणार नाहीं व लडाखबाबत कांहींतरी मध्यस्थी करील अशी नेहरूंना आशा वाटत होती, तोंच १९६२ च्या सप्टेंबर–ऑक्टोबरमध्यें चीननें नेफावर मोठें आक्रमण केलें.

मला त्यावेळीं फार आश्चर्य वाटलें व चीनला रशिया आक्रमणापासून आवरील असा माझाही नेहमीं अंदाज असल्यानें रशियानें भारताचा विश्वासघात तर केला नाहींना अशी शंका मला आली. पण ती दोनच दिवस टिकली. २० ऑक्टोबरला चीनचा नेफावर हल्ला झाला आणि २२ ऑक्टोबरपासून क्यूबाभोवतीं रशिया व अमेरिका यांच्या मध्यें ॲटॉमिक युद्ध होणार असें वारें वाहूं लागलें. चीनला या प्रकरणाची आगाऊपासून अंतर्गत माहिती असल्यानें युरोप व अमेरिका ॲटॉमिक युद्धाच्या रणधुमाळींत सांपडणार हें हेरून आशियावर वर्चस्व स्थापण्याचा प्रयत्न आपण केल्यास यावेळीं आपणास कोणी दाबणार नाहीं अशी चीनला खात्री वाटली व त्यानें भारतावर हल्ला चढविला. ही उपपत्ती अलीकडे अनेक विद्वानांनी मांडली आहे. मी ती ता. ५ व ६ नोव्हेंबर १९६२ रोजीं लिहि-






अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

लेल्या लेखांतच दिली होती. त्यावेळीं क्यूबाचें ॲटॉमिक युद्ध टळलें व अँग्लो-अमेरिकनांनीं भारताला बरेंच शस्त्रास्त्र साहाय्य दिलें. पण अखेर चीननें माघार घेतली ती रशियानें त्याला मागे खेचलें म्हणून घेतली असें ब्रिटनच्या 'गार्डियन' पत्रानें म्हटलें आहे यामुळें त्याबद्दल येथें अधिक युक्तिवाद करीत नाहीं.

पुढील काळांत रशिया-चीन वैर वाढत गेलें व हें वैर नेहरूंच्या परराष्ट्र धोरणामुळेंच उद्‌भवलें, असा आरोप माओनें जाहीरपणें केला आहे. याचा अर्थ कोरिया, इंडो-चीन वगैरे प्रकरणीं नेहरूंनीं युद्ध थांबविण्यांत पुढाकार घेऊन रशियाचा पाठिंबा मिळविला. यामुळें चीनच्या आग्नेय आशियांतल्या आक्रमणाला पायबंद बसला ही गोष्ट चीनला झोंबली असाच होता. कोरिया व इंडोचीन या दोन्हीं द्वीपकल्पांतली युद्धें थांबलीं नसतीं तर त्यांतून ॲटॉमिक युद्धें तरी निघालीं असती अथवा त्या दोन्ही द्वीपकल्पांचें स्वामित्व चीनकडे जाऊन आग्नेय आशिया चीनच्या घशांत पडला असता व भारत आणि रशिया या दोघांनाही चीनपासूनचा धोका वाढला असता. पण नेहरूंनी चीनला पायबंद घालण्याला रशियाचा पाठिंबा मिळविला व या नेहरूंच्या धोरणामुळें चीन व रशिया यांचें वैर उद्‌भवलें असे माओचें म्हणणें.

माओचें हें म्हणणें वस्तुत: खरें आहे. पण रशिया व चीन यांचेमध्ये कलागत लावण्याची कुटिल नीति नेहरूंनी अवलंबली हा त्याचा आरोप खोटा आहे. निर्वैर व युद्धविरोध हीं जी बुद्धाचीं परमोच्च तत्त्वें त्यांचा गांधींनी आपल्या राजकारणांत अवलंब केला व तीच तत्त्वें त्याच निष्ठेनें आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय राजकारणांत नेहरूंनी अवलंबली. आजच्या ॲटॉमिक जगांत तीच व्यवहार्य ठरलीं. खिस्ताची शिकवण आजच्या शास्त्रीय युगांत खरी ठरली असें शॉ म्हणतो त्याप्रमाणें बुद्धाची सहजीवनाची व निर्वैराची शिकवण आतां अवलंबली पाहिजे असें नेहरूंनी प्रचारिले ते रशियाला बऱ्याच प्रमाणांत पटलें आणि ते न पटणाऱ्या चीनला रशिया विरोध करूं लागला व भारताचा मित्र झाला.

सहजीवनाची नेहरूंची शिकवण हें स्वप्नरंजन आहे असें म्हणणाऱ्यांना तें स्वप्न सत्य सृष्टींत अवतरलें हें पटले पाहिजे. पण नेहरूंचे पुष्कळसे पक्षपाती हे स्वार्थी पुजारी आहेत व विरोधी टीकाकार अजून 'युद्धस्य वार्ता रम्या' त्या युगांतले आहेत. नेहरूंचा अत्याधुनिक दृष्टिकोन युद्धांत होरपळून निघालेल्या युरोपियांना जसा कळतो तसा फक्त युद्धवार्तांची गोडी चाखलेल्या भारतीयांना कळत नाहीं. 'अहिंसेनें भारताचें वाटोळें केलें' असे भारतांतील सुप्रीम कोर्टाचे एक जज्ज म्हणाले यावरून युरोपीय विचार पातळीच्या आपण किती खालीं आहोंत हें कळते.

खरोखर बुद्धतत्त्वांच्या नादानें नेहरूंनी भारताच्या बचाव प्रयत्नांत हेळसांड केली का ? संरक्षण खात्याची अंतस्थ माहिती मला नाहीं. पण राजकारणापुरते बोलायचे तर नेहरू उच्च तत्त्वांचा अवलंब करीत असताही व्यवहारांत रास्त मार्गानेच चालले होते असें मला वाटतें. चीनपासूनच भारताला धोका आहे ही गोष्ट १९५० सालींच नेहरूंना दिसली. कोरिया व इंडोचीन येथें चीनला पायबंद घालण्यासाठींच त्यांनी जगांतील राष्ट्रांना एकत्र आणले.

पण नेहरूंनी चीनबरोबर सामना देण्याची तयारी केली नाहीं हें खरें आहे. त्याचें कारण इतिहासांत आहे. चीनची प्रचंड लोकसंख्या, तिचा एकजिनसीपणा व कडवा देशाभिमान, हजारो वर्षांचें चीनचें परंपरागत शेती कौशल्य, चाळीस वर्षें कम्युनिस्ट हुकूमशाहीखालीं होत आलेली चीनची संघटना आणि गनिमी युद्धाचा व मैदानी युद्धाचा यादवीतला व आंतरराष्ट्रीय युद्धांतला पस्तीस वर्षांचा अनुभव, शिवाय क्रांतीनंतरच्या दहा-वर्षांत रशियाचें चीनला मिळालेलें साहाय्य या सर्व कारणांनीं चीन बलाढ्य झाला होता. अमेरिकन सैनिकांना कोरियांत आणि फ्रेंचांना इंडोचीनमध्यें कम्युनिस्ट सैन्यापुढें माघार घ्यावी लागली होती. उलट भारतीय जनता लोकसंख्येने मोठी असली तरी हजारों वर्षांत जाती, धर्म, पंथ, यांनी 'फाटलेली व फुटलेली' होती. कोट्यवधि हिंदु परधर्मांत गेले व या बाटलेल्यांना अथवा उरलेल्या हिंदूंना भारत हा स्वदेश ही कधीं जाणीवच नव्हती. हजारों वर्षांत स्वदेशासाठीं कोणीहि रणांगण लढलेले नव्हते. असा हा भारत गांधी नेहरूंनीं निर्माण केला नव्हता, त्यांना वारसा म्हणून पत्करावा लागला होता. जे हिंदुत्वनिष्ठ गांधी नेहरूंना नांवें ठेवतात त्यांना व त्यांच्या पूर्वजांना गेल्या तेराशे वर्षांत केव्हांही अखिल भारतांतल्या हिंदूंची एकजूट करून मुसलमानांचा प्रश्न सोडवितां आला असता तर भारताचें नेतृत्व आज गांधी-नेहरूंच्या हातीं न जातां त्या हिंदुत्वनिष्ठांच्या हातींच गेलें असते. असो.

चीन व भारत यांच्या सामर्थ्यांतील विषमता नेहरूंना दिसली होती हें उघड आहे. कारण चीनचा प्रश्न आपण रणांगणावर सोडवूं शकणार नसून तो राजकीय मुत्सद्यांनी राजकारणाच्या मार्गानें सोडविला पाहिजे असे ज. थिमय्यांचें मत चीनच्या आक्रमणापूर्वी पासून होतें असें आतां बाहेर आले आहे. म्हणून युद्ध टाळायचें, त्यासाठीं तणातणी टाळायची, त्यासाठीं शस्त्रास्त्र-साहाय्याचे करार टाळून सर्व राष्ट्रांशी मैत्री ठेवायची व आर्थिक विकास पुष्कळ झाल्याशिवाय राष्ट्र समर्थ होत नाहीं म्हणून आर्थिक विकासावर भर द्यायचा, हें धोरण नेहरूंनी अवलंबले. त्याप्रमाणें अनेकदां जगाला, आशियाला व भारताला त्यांनीं युद्धापासून बचावले आणि चीननें जरी आक्रमण केलें तरी नेहरूंच्या रशियाशीं स्नेह ठेवण्याच्या धोरणामुळेंच चीनला मागें जावे लागले हें नेहरूंच्या धोरणाचें यशच आहे.

एकच प्रश्न येथें उरतो. अमेरिकेचें शस्त्र-साहाय्य ज्या इराण, पाकिस्तान, सयाम यांनीं घेतले त्यांच्यावर चीननें आक्रमण केलें नाहीं आणि असें साहाय्य न घेणाऱ्या भारतावर आक्रमण केले "हीच नेहरू धोरणाची फजीती नव्हे काय ?" असा प्रश्न विचारला जातो. पण भारतासारखें आशियातले मोठें राष्ट्र अमेरिकेच्या शस्त्रास्त्र करारांत नसल्यानें आशियांत युद्धाची भीति

(पान ५६ वर पहा)


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

## ऐन तारुण्यांतच यशस्वी झालेल्या तरुणाचें चित्र-



■ त्याच्या कर्तबगारीला भरपूर वाव देणारी व उज्वल भवितव्य असलेली कायम नोकरी आहे त्याला. त्याचें बँक ऑफ इंडियामध्यें सेव्हिंग्स खातें असून दर महिन्याला पगारांतील ठराविक रक्कम तो शिल्लक टाकतो.

■ बँक ऑफ इंडिया मार्फत तो प्रथम श्रेणीचे शेअर्स व कर्जरोखे यांची खरेदी करून ते सर्व सुरक्षित ठेवणें, त्यावरील व्याज नियमित वसूल करणें वगैरे कामें तो करून घेतो.

■ बँक ऑफ इंडियाच्या, वटावा शिवाय पैसे पाठविणें व वसूल करणें, ठराविक वेळीं करावयाच्या कामांच्या सूचना देऊन ठेवणें इत्यादि सोईंचा तो भरपूर उपयोग करून घेतो.

■ बँक ऑफ इंडियालाच त्यानें 'विवाहीत स्त्रीची मालमत्ता' ह्या कायद्याखालीं काढलेल्या आपल्या आयुर्विमा पॉलिसीचे विश्वस्त नेमले आहे, त्यामुळें आपल्या कुटुंबाच्या हितसंबंधाची त्याला आतां काळजी नाहीं.

■ त्याला विश्वास आहे कीं, कोणत्याही लहान मोठ्या आर्थिक व्यवहारांत अनुभवी सल्ला व योग्य तें मार्गदर्शन
**बँक ऑफ इंडिया**
कडून केव्हांही मिळेल.

# दी बँक ऑफ इंडिया लि.



टी. डी. कंसारा, जनरल मॅनेजर

B.C.172 MAR








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका





मा. कृ. पारधी

आज तूं पुन्हां भेटलीस – या संकेतस्थानीं!

पण आजचा संकेत तुझ्याशीं ठरलेला नाहीं. मग कां आलीस तूं? कां अशी नेमकी नको तेव्हां येऊन मला छळतेस?

तुझ्याशीं ठरलेला संकेत केव्हांच मोडून टाकला आहेस तूं. तुला पाहिलं की तें शल्य माझ्या मनांत टोचूं लागतं. हो. मी तुझा द्वेष करतों. कारण माझ्या बरोबर चालण्याचं धैर्य तुला नाहीं, आणि माझी वाट मात्र अचानक येऊन अडवीत असतेस.

तुझी ही जाडी भरडी भगवी साडी डोळ्यांत खुपते माझ्या. तुझ्या अन्तर्बाह्य मरड भगवेपणाचा तिटकारा वाटतो मला. नायलॉनची झिरझिरीत साडी कधीं नेसली आहेस तूं? काजळाची बारीक रेघ डोळ्यांतून फिरवून पापण्यांच्या कोपऱ्यांत रेखली म्हणजे नजरेला किती खुमारी येते हें ठाऊक आहे तुला? उरोजांचीं टोकं तंग काचोळींतून उभारलीं म्हणजे क्षितिज कसं आलिंगायला धावतं हें अनुभवलं आहेस तूं?......तुला हें कांहींच ठाऊक नाहीं. तुला तें जमणारहि नाहीं. जाडचा भरडचा भगव्या वस्त्रांत आपली काया वावळटपणें घुसमटून टाकण्यांतच तुला भूषण वाटतं.

जें तुला ठाऊक नाहीं, जें तुला जमणार नाहीं, तें जिच्याजवळ नखशिखांत सजलेलं आहे तिच्यासाठीं आजचा माझा संकेत आहे. ह्या साऱ्या साजासकट नीला आणखी दहा पंधरा मिनिटांतच येथें येईल आणि तिच्या साजानं मी वहरून जाईन. आणि मग तुझा हा वावळट भगवेपणा मला किती तुच्छ वाटतो हें माझ्या डोळ्यांत तुला दिसून यईल. तें तूं पाहण्यासाठीं पंधरा मिनिटं तुझं नको असलेलं दर्शन सोसायला तयार आहे मी.

नीला कोण आहे तें तुला ठाऊक नाहीं. तें तुला कळलं तर तुझ्या अंगावर काटा येईल. माझ्या अवःपतनाची तूं कीव करशील. आणि तसं झालं म्हणजे तुझ्या त्या सोवळचा श्रद्धांना छेडल्याचा मला आनंद होईल. तुझ्यासकट तुझ्या त्या सोवळचा श्रद्धांना मी किती तुच्छ लेखतों हें कधीं तरी तुला समजलंच पाहिजे.

नीला आल्यानंतर काय होणार आहे तुला माहित आहे? जगांत जें कांहीं अमंगळ आहे असं तुला ऐकून माहित आहे त्या अमंगळाचं निर्भेळ सुख मी भोगणार आहे–

नीला आली की येथूनच टॅक्सी घेऊन आम्ही प्रथम मलबार हिलवर जाऊं. मी म्हणेन तिथें येईल ती – मी मागेन तें देण्यासाठीं, जवळ आहे तें सर्व माझ्या लहरीनुसार मला भोगूं देण्यासाठीं. पण माझ्या लहरीवर तिला नाचवण्या इतका मी मतलबी नाहीं हें तुला सांगून टाकतों. जो अनुभव दोघांच्या सहकार्यांतून निर्माण होतो त्यांत सहकारी समरस नसेल तर तो अनुभव मला आनंद देऊं शकत नाहीं. खरं म्हणजे, तिनं मला कांहीं द्यावं अशी माझी अपेक्षा नाहीं आणि तिला कांहीं देण्याची माझी इच्छा नाहीं. परस्परांची उन्मत्त वासना, परस्परांचा उत्तेजक आनंद आम्ही दोघेहि उपभोगणार आहोंत. मलबार हिलवर एखाद्या आडोश्याच्या जागीं बसून मावळतीचं आरक्त वैभव समोरच्या जललहरींवर झळकतांना पहात आम्ही मनमुराद गप्पा मारणार आहोंत. भोवतालच्या झाडांवेलींवर काळोख साकळूं लागला म्हणजे येणाऱ्या गूढतेंत आमच्या भावनांच्या पाकळचा हळूच उमलणार आहेत; सुखद स्वच्छंद सळसळ परस्परांच्या स्पर्शांतून शरीराचे बंद उकलत जाणार आहेत. नीला मोठी चतुर आहे, लाघवी आहे, रसलोलुप आहे, आणि तिच्या अंगांगांत शृंगाराचा विलोल उल्लास आहे. कसलेल्या कलावंतीणीची छटेल पोर आहे ती – नृत्य – गान – निपुण कलावती. हलक्या आलिंगनांत पांखराच्या पिसासारखीं मुलायम चुंबनं ती मला देत असतांना कुसमुसणाऱ्या तिच्या शरीरांतल्या लहरी काळोखाला बहाल करून आम्ही उठणार आहोंत. मग अंधाऱ्या पाऊलवाटेला आमच्या







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

***तेव्हांपासून हा यज्ञ मांडला आहे — जो तुला माझा अध:पात वांटतो. या यज्ञांत भोगाच्या रूपानं स्वत:चीच आहुति टाकीत बसलोंय् मी. कदाचित या आहुतीनंतर तुझ्या प्रेमाचं वरदान मला लाभणार असेल. पण आज हा भोगयज्ञ सुरू आहे तो मात्र तुझ्या प्रेमाच्या अभिलाषेनं नव्हे !***

---

अस्तित्वाचा फारसा भार वाटूं न देतां बाहेर येऊन आम्ही कुठल्या तरी हॉटेलांत जेवायला जाऊं. तिची लहर लागल्यास पुन्हां टॅक्सी करून कोटांत मॉंजिनीमध्यें सुद्धा जाऊं. जेवण आटोपलं की चौपाटीच्या, महालक्ष्मीच्या किंवा वरळीच्या समुद्रावर जाऊन शहाळं पीत माडाच्या झावळ्यांचं गीत लाटांच्या तालावर ऐकत वसूं. खर म्हणजे मला आवडतो महालक्ष्मीचा खडकाळ लाटाळ समुद्र. पण माझी ही आवड मी तिच्यावर लादणार नाहीं. आणि मग सारी रात्र आम्ही एकत्र घालवणार आहोंत. एकमेकांच्या वेहोषींत सारी रात्र बुडवून टाकणार आहोंत.

उद्यां सकाळीं विस्कटलेला सैल देह सावरून ती माझ्या खोलींतून बाहेर पडेल तेव्हां तिच्या पर्समध्यें माझ्या खिशांतील पन्नास रुपयांच्या नोटा असतील. तुला हा पापाचा सौदा वाटेल. पण मला ती तिची विदागी वाटते. पुराणिकाला नाहीं का आपण दोन तास प्रवचन करून आपलं रंजन केल्यावद्दल विदागी देत? तूं नाहीं का देवाला नैवेद्य दाखवीत ? तुझ्या सोवळेपणाला हवंच असेल तर एवढं सांगूं शकतों कीं नीलेला माझ्याकडून हीं विदागी हवीच असते असं नाहीं. इतरांपेक्षां ती मला वेगळं वागवते. प्रेम म्हणतात तें तिचं माझ्यावर कदाचित् असावं पण आम्हांला त्याच्याशीं कांही कर्तव्य नाहीं. मला एवढंच कळतं की ती मला आवडते आणि हा तिचा धंदा आहे. म्हणून तिनं मला दिलेल्या वस्तूची किंमत मी तिला दिली पाहिजे. मात्र तूं तिला वाजारवसवी म्हटलेलं मला रूचणार नाहीं. हें मी तिच्या विषयींच्या कांहीं मलत्या प्रेमानं वोलत नाहीं. तिची किंमत तुला कळावी म्हणून सांगतों. पैसा फेकणाऱ्या कोणालाहि ती वश होईल असं समजू नकोस. फार चोखंदळ आहे ती. कित्येक वेंगरुळ आणि वेढव शेटजींना तिनं वाटेला लावल्याचं मला ठाऊक आहे. खरीखुरी विलासिनी आहे ती. धंद्याच्या पोतेऱ्यानं तिच्या विलासाचा रंग सारवून टाकलेला नाहीं. एखाद्या दर्दी जवाहिऱ्याकडे लाख मोलाचे निवडक हिरे असावेत आणि एखाद्या रसिक धनाढ्यालाच त्याची पायरी चढण्याचं भाग्य लाभावं, असा ऐटदार धंदा आहे तिचा. ह्या जवाहिऱ्याचं वैभव भोगण्याचं भाग्य माझ्यासारख्या सामान्य माणसाच्या वांट्याला आलं हें एक नवलच.

हें भाग्य किती काळ टिकेल, हे मी कसं सांगूं? कदाचित तें संपावं असं मला वाटण्याच्या आधींच तें संपुष्टांत येईल. ती विलासिनी आहे, शेकडों लोकांचं तारुण्य आपल्या धनासह तिच्यासाठीं लालचावलेलं आहे; आणि माझा तिच्यावर कांहींहि अधिकार नाहीं — अधिकार असावा अशी मला इच्छाहि नाहीं. मग ती माझ्यापासून गेली तर त्याचं काय दुःख? नाहीं तरी उद्यां सकाळीं ती माझ्यापासून जाईल तेव्हां आज रात्रीं आकाशांतल्या नक्षत्राप्रमाणं फुलणारी तिच्याविषयींची अभिलाषा लोपून गेलेली असेल. आमच्या प्रत्येक भेटींत हें असंच होत आलं आहे. तिनं भेटावं असं जेव्हां वाटतं तेव्हां ती जोंपर्यंत भेटते तोंपर्यंत ती पुन्हा कधींहि भेटणार नाहीं अशा अवस्थेचा विचार मूर्खपणाचा आहे. आणि समजा तसं झालं, तरी काय विघडलं? कोणतंहि वरदान आंबून त्याचा वीट येईपर्यंत लाभण्यांत काय अर्थ आहे? त्याची गोडी उतरण्यापूर्वींच तें संपलेलं वरं.

नीला पुन्हां भेटेनाशी झाली म्हणून जग कांहीं ओस पडणार नाहीं. पोटाच्या गरजेमुळें असो की मांसाच्या रगेमुळं असो, आपल्या यौवनाची खैरात मांडणाऱ्या पोरी या मुंवईंतहि शेकड्यानं निघतील. तुला त्या दिसायच्या नाहींत. पण त्यांना ओळखण्याइतके माझे डोळे आतां तरवेज झाले आहेत. त्यांच्या वेळा नि ठिकाणं मला अवगत आहेत. नीलेला असंच मी महालक्ष्मीच्या





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

रेसकोर्सवर हेरलं. त्या दिवशीं माझा घोडा आला होता. आता नीला गेली तर दुसरी कोणी भेटेल. रेसकोर्सवर नाहीं भेटली तर फ्रेंच पुलाजवळ भेटेल. विलासिनी नसली तर वारयोषा असेल. सध्यां ही नीलेची महाग सोबत जेव्हां मला परवडत नाहीं तेव्हां फ्रेंच ब्रिजची नाहीं तर कुलाब्याची सामान्य छोकरी मला गांठावीच लागते. माझा खिसा रिकामा असतानांहि तितक्याच अगत्यानं माझं स्वागत करायला नीला तयार असली तरी तें करून घेण्यांत मला माझी लाचारी वाटते. अशा लाचारीनं सहवासाची मौज कलुषित होते. आणि खरं सांगूं? प्रणयाचा खरा आनंद ज्याला भोगायचा असेल त्यानं प्रेमापासून दूरच राहावं. नीलेच्या सहवासांतच हें तत्त्व शिकलों मी. निर्मळ विलासाला दैन्य खपत नाहीं तसं प्रेमहि झेपत नाहीं. प्रेमानं विलासाचा स्वच्छंदीपणा नाहींसा होतो. माझा एक कवि मित्र म्हणाला होता—'मज ठाऊक नव्हतें प्रीति मिळते हाटीं। मी झुरलों नसतों असल्या प्रीतीसाठीं।' त्यावेळीं मला हें बोलणं थिल्लरपणाचं, विकृत वाटलं होतं. आतां त्यांतलं सत्य उमगलसं वाटतंय. खरं म्हणजे, माणसाला प्रीति नकोच असते. आणि प्रीतीच्या वेगडांत झाकलेलं जें हवं असतं तें हातांत मिळायला लागल्यावर प्रीतीसाठीं झुरणं व्यर्थच. पण कवीला मात्र हातांत मिळतं तेंहि प्रीतीच्याच नांवानं गोंजारावंसं वाटतं. विचारा कवि!

हें मुद्दाम सांगतोय मी तुला. कारण एकदां मीहि तुझ्या प्रीतीसाठीं झुरलों आहे. कदाचित तुला तें कधींच कळलं नसेल. निदान तुला तें कळतच नसल्याची तूं आजवर वतावणी तरी करीत आली आहेस. कधीं तरी माझ्याकडे पाहतांना तुझे डोळे लाजेनें खालीं वळावेत, कधीं तरी माझ्या स्पर्शानें तुझं अंग रोमांचित व्हावं, कधी तरी माझा हात हातांत घेतल्यावर तुला सुखाची तंद्री यावी आणि क्षणांत तूं बावरून आपला हात काढून घ्यावास—अशा क्षणाची मी महिनोगणती वाट पाहिली. परंतु तो क्षण कधींच आला नाहीं. तुझ्या निवलेल्या डोळ्यांतून सदैव माझ्यावर प्रेमळपणाचा वर्षाव होत राहिला आणि मी तुझ्या प्रीतीसाठीं मनांतल्या मनांत झुरत राहिलों. तुझी प्रीति मला मिळाली नाहीं; आणि त्या प्रीतीचा नाद सोडून जेव्हां मी माझा आनंद शोधूं लागलों तेव्हा ठिकठिकाणीं अशी अचानक येऊन माझी वाट मात्र अडवीत राहिलीस.

तुला वाटतं, मी अध:पाताच्या वाटेनं जात आहे. मलाहि एका काळीं तसंच वाटत होतं. आतां मी वाट बदलली असं नाहीं. पण याला अध:पात कां म्हणावं हें मात्र आतां मला कळेनासं झालं आहे. मला जेव्हां हा अध:पात वाटत होता तेव्हांची माझी दृष्टि दुसऱ्याच वाटेवर घडलेली होती. त्या वाटेवरून ही वाट जेव्हां जशी दिसत होती तशी आतां वाटत नाहीं. पापाची कल्पना ज्याच्या मनांत आहे त्याला एखादी गोष्ट पाप आणि दुसरी गोष्ट पुण्य वाटावी हें ठीक आहे. पण ज्याच्या मनांत पापाची कल्पनाच उद्‌भवलेली नाहीं त्याच्या कोणत्याहि कृतीला पाप कसं म्हणायचं? 'न माम् पापाणि लिम्पन्ति' म्हणणाऱ्या भगवंताचं बाळपणीं दही-दूध चोरण्यापासून भारतीय युद्धांत अनेक कपटनाटकं रचण्यापर्यंतचं लुच्चेगिरीनं आणि पापांनीं भरलेलं आयुष्य पाहिलं म्हणजे त्याच्या ह्या विधानाचा दुसरा कांहीं अर्थ लावणं मला अशक्य वाटतं. तेव्हां माझ्या वागण्यांत तुला अध:पात दिसला तरी मला खंत नाहीं.

ही अध:पाताचीच वाट असली तर ती मला तूंच दाखवली आहेस हें तुला खरं वाटणार नाहीं. ज्या तुझ्या प्रेमासाठीं मी तळमळत होतों तें जर मला लाभलें असतें तर तुझी वाट सोडून ह्या वेगळ्या वाटेला लागण्याचं मला कारणच उरलं नसतं.

ही वेगळी वाट काढतांना मला किती दु:ख झालं याची तुला कल्पना नाहीं. मी आश्रम सोडून जावं हें स्वामीजींना जसं आवडलं नाहीं तसं तुलाहि फार दु:खदायक झालं हें मी जाणतों. स्वामीजींचा मी जितका लाडका होतों त्याहून अधिक तुझा माझ्यांत जीव होता. पहाटे मला वेळेवर जागं करण्यापासून माझ्या ध्यान-धारणेच्या व्यवस्थेपर्यंत तूं माझं रोज किती अगत्यानं करीत होतीस हें मी विसरलों नाहीं. माविकांकडून प्रसादादाखल आलेल्या फळांतलीं जीं शेलकी फळें लाडीगोडीनं स्वामीजींकडून आणून माझ्या फराळाच्या वेळीं मला स्वत: खाऊं घालीत होतीस त्यांची मधुर

## महत्त्वाची सूचना -

**लेखकांसाठीं : बऱ्याच लेखकांचें "दीपावली" कडे आलेलें व नापसंत ठरलेलें साहित्य आमच्याकडे कांहीं महिने पडून आहे. तें परत हवें असेल तर त्या लिखाणास पुरेसें पोस्टेज लेखकांनीं त्वरित पाठवावें म्हणजे तें त्यांच्या पत्त्यावर रवाना करतां येईल. दि. ३० जून १९६४ पर्यंत पोस्टेज पाठविणाऱ्यांसच असें साहित्य परत करण्यांत येईल. अन्यथा तें तावडतोब निकालांत काढलें जाईल व त्यासंबंधीं पुनः कसलाहि पत्रव्यवहार केला जाणार नाहीं. नापसंत कविता परत पाठविल्या जात नाहींत याचीहि कृपया नोंद घ्यावी.**

**—संपादक**

**वर्गणीदारांसाठीं : ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपया करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**

**—व्यवस्थापक**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

चंव अजून माझ्या मनांतून गेली नाहीं. 'निरंजनचं तुझ्याशीं पूर्वजन्मीचं कांहीं खास नातं असलं पाहिजे' असं कांहीं स्वामीजींनी तुला थट्टेनं म्हटलं म्हणजे तुझे डोळे लाजऱ्या आनंदानें कसे भरून येत असत ते मी पाहिलं आहे. 'बेटी ! निरंजनवर इतकं प्रेम करूं नकोस. तें कच्चं मडकं आहे. या तुझ्या प्रेमानं तें भाजण्यापूर्वींच टिचायचं एखाद्या वेळीं,' असं स्वामीजीनी थट्टेनं म्हटलं तेव्हां तूं स्वामीजींशी भांडत बसलीस, परंतु मी मनांत चरकून गप्प बसलों होतों. माझं मनोगत मला उमगण्यापूर्वींच स्वामीजींनी कसं ताडलं याचं मला नवल वाटलं होतं. पण त्यानंतर तीनच महिन्यांनीं तें भाकित खरं ठरलं. तुझ्या प्रेमासाठीं चाललेली माझ्या मनाची तगमग मी स्वामीजींना स्पष्ट सांगितली. 'तुला वाटतं तें अस्वाभाविक नसलं तरी जें तिच्यांजवळ नाहीं तें तिच्याकडून मिळण्याची अपेक्षा करणं व्यर्थ आहे,' असा स्वामीजींनी सल्ला दिल्यावर मी आश्रम सोडण्याचा निर्णय घेतला; आणि तो त्यांना आवडला नाहीं तरी त्याविना गत्यंतर नाहीं हें ओळखून त्यांनीं मला आशीर्वाद दिला–'बेटा निरंजन! प्रारब्धाची गति मोठी गूढ आहे. तुझं प्रारब्ध आज तुला बाबापासून दूर नेत आहे. पण बाबाला विसरूं नकोस. जगांत बरं-वाईट कांहींहि कर पण बाबाची आठवण ठेव. जें करशील तें कृष्णार्पण कर म्हणजे तें तुला बाधणार नाहीं. यावंसं वाटेल तेव्हां बाबाकडे परत ये. त्यावेळीं बाबा या देहानें जगांत नसला तरी इथल्या धडग्यांत तो तुझ्यासाठीं जिवंत असेल असं समज.'—

तेव्हांपासून हा यज्ञ मांडला आहे–जो तुला माझा अधःपात वाटतो. या यज्ञांत भोगाच्या रूपांनं स्वतःचीच आहुति टाकीत बसलोंय मी. कदाचित या आहुतीनंतर तुझ्या प्रेमाचं वरदान मला लाभणार असेल. पण आज हा भोगयज्ञ सुरू आहे तो मात्र तुझ्या प्रेमाच्या अभिलाषेनं नव्हे. मी आश्रम सोडून जातांना तूं डोळ्यांत पाणी आणून जी गीतेची प्रत मला भेट दिलीस ती मला जपून ठेवावीशी वाटत असली तरी सध्यां कपाटांत धूळ खात पडून आहे. आणि आतां तुझं अस्तित्वहि माझ्या मनांतून पुसून गेलं आहे.

पण तूं अशी अचानक समोर येऊन उभी राहिलीस म्हणजे माझ्या मनांत कालवाकालव सुरू होते हें मी नाकारीत नाहीं. विशेष हें की तूं येतेस त्या योगायोगाचं मला आकलनच होत नाहीं. स्वामीजींच्या आश्रमांत कोणी तरी भेटायचंच होतं, त्यांत तूं भेटलीस यांत विशेष कांहीं नाहीं. आश्रमांतील तीन वर्षांच्या सहवासांत आपणांला एकमेकांचा लळा लागला यांत विशेष कांहीं असलंच तरी तें सहधर्मियांच्या स्वाभाविक ओढी पुरतंच. पण मी आश्रम सोडल्यापासून तूं जी अशी अकल्पित येऊन भेटतेस तीं कां?

मी आश्रम सोडल्यानंतर तूं मला प्रथम भेटलीस त्या वेळीं मी महालक्ष्मीच्या देवळामागच्या कट्ट्यावर माझ्या हृदयाच्या चिंधड्या चिवडीत बसलों होतों. मनांत सूडाचा सुरा धार धरीत होता. समोरच्या उफाळत्या सागरांत झळाळणारं सूर्याचं करवती बिंब जणुं त्या मनांतल्या सुऱ्याचंच विशाल रूप होतं. तूं समोर येऊन उभी राहिल्यानं तें वारंवार बिंब डोळ्यांआड झालं; पण तुझी ओळख पटायला वेळ लागला. तूंच हाक मारून मला मानावर आणलंस. अशीच भगवी भरड साडी नेसली होतीस. 'निरंजन ! तुमच्या मनांत कांहीं भयंकर विचार चालले आहेत. तुमच्या चढलेल्या डोळ्यांना माणसाची ओळख राहिलेली नाहीं,' असं म्हणालीस तेव्हां तुला सांगून टाकावंसं वाटलं, हो. मी सूडानं पेटलों आहे. मंगलेचा, जमल्यास तिच्या प्रियकरासह, खून करण्याचा बेत आखतोंय मी. मंगलेनं गेले दोन महिने राजेशच्या नादीं लागून माझ्या प्रेमाच्या कशा चिंधड्या केल्यात हें ठाऊक नाहीं तुला.....' पण कांहीं बोललों नाहीं. हें बोलणं तुला समजणार नाहीं म्हणून गप्प राहिलों. 'एक वर्षांतच ओळख विसरूं नये माणसानं,' असं म्हणत तूं माझ्या खांद्यावर हात ठेवलास तेव्हां माझ्या डोळ्यांना धार कां लागली हें मला अजून कळलं नाहीं. माझ्या पाठीवरून फिरणाऱ्या तुझ्या प्रेमळ हातानं तेव्हां मला दिलासा दिला एवढं मात्र खरं. आणि तूं

(पान ५१ वर पहा)



"बंड्या, चल हो बाजूला आतां तुझे बाबा खालीं येत आहेत.

# अग्निमाता डोंगर

**पूर्व कथासूत्र :**

**गांवांत कंपनी आली होती. तिचा असिस्टंट मॅनेजर विजय—अण्णा गुरुजींचा भाचा. दाजी नाबरांची मुलगी त्याच्यावर प्रेम करूं लागते. पण एके दिवशीं तिनें त्याच्या जातीचा उल्लेख केला. त्यानें तिच्याकडे पाठ फिरवली. खाणींत कामाला लागलेल्या लोकांना देण्यांत येणारी वागणूक पाहून तो व्यथित झालेला असतो. गांव त्यांच्याशीं माणुसकी सोडून वागतं. त्यांच्यांतलंहि जनावर जागं होतं. अशा परिस्थितींत कंपनींतील एक मेस्त्री गांवांतील एका अल्पवयीन मुलीवर बलात्कार करतो. गांव पेटतो. घाट्यांना गावांबाहेर घालवूं पहातो. पण त्या प्रसंगीं दाजी नाबर घाट्यांच्या बाजूनें उभा राहतो. गांवाविरुद्ध—एकटाच. आणि मग.....**

## [२१]

**दुसऱ्या** दिवशीं सकाळला कंपनीचा भोंगा कानीं पडला आणि तशीं वर रानांतच कुठंतरी दडी मारून बसलेलीं घाटी लोकं अंगाखालचं टुवाल झटकून डोईला गुंडाळत दुडक्या चालीनं खाणीकडे धांवत निघालीं.

उभी रात्र जिकिरींत गेली. जिवाचा ध्यास, नसती फिकीर ! डोळा कसा तो लागलाच नाहीं. तरीहि आठाच्या भोंग्याला ठीक, वेळेवर तीं हजर होतीं.

पण हजेरी घ्यायला मुकादमांचा मात्र पत्ता नव्हता. हरताळ होता म्हणे त्यांचा. वाजूला चहाच्या हटलांत या मंडळीनं मोठा नेट धरला होता. खूप वकवा चालवला होता. खाणीवर एकसुद्धां घाटी इसम नाहीं पाहिजे. मग कंपनी वंद झाली तरी बेहेत्तर !.... वगैरे, वगैरे. आणि ह्यांना फूस होती गांवाची. म्हणजे कामधंदा टाकून गांवचीं लोकं इथं कंपनीच्या हापिसाबाहेर गोळा झालीं होतीं. मॅनेजराला आडवा घालण्याच्या आणि कंपनीला खाटल्यावर चढवण्याच्या एक एक जोरदार घोषणा उठत होत्या.

आंत हपिसांत विजय आपल्या खुर्चीवर स्वस्थ वसून होता. वाहेर वघत—समोरच्या दारांतून, फाटकावरच्या ह्या गर्दीकडे. आणि थंडपणं ऐकत होता— जमावाच्या शिव्या, घोषणा, गर्जना. इतर अधिकारी इथंच विजयच्या खोलींत जमले होते. ह्यांना काळजी पडली होती, कासाविशी लागली होती. आत्तां पुढं काय होणार ?

एकटा रामप्पा शेट्टी तेवढा जोरांत होता. नाहीतरी गुंडच तो, फाटक वंद होतं. आणि मागं डरकाळ्या फोडत रामप्पा उभा. हातांत हंटर घेऊन उगाच फाड्फाड् आवाज काढीत होता. ओरडून सांगत होता, "साला, चमडी निकलूंगा, जान लेवूंगा ! ऐसो की वैसी, भांचोद अंदर तो आव !"

ह्या राक्षसाला समोर उभा वघितला कीं जमावाला देखील धीर होत नव्हता. पुढं होण्याची एकालाहि हिंमत होत नव्हती. रामप्पानें गर्दीला फाटकावरच रोखलं होतं.

भले चार तास !

आणि मग अण्णागुरुजी आला. तांतडीनं, जीपमधून. गर्दीनं पाठ फिरवली. जीपला गराडा दिला. बोंव ठोकली, "अण्णा, घाट्यांचं काय केलंस ?"

"अरे, हेंच सांगायला आलों रे !" अण्णागुरुजीला खात्री नव्हती. आवाजांत जोर नव्हता. उपरणं उघड्या अंगावर नीट पांघरत जीपमधून तो खालीं उतरला. वारांचा सुमार. सरत्या माघांत भर दुपारला इथं तळपीवर त्याला हुडहुडी भरली होती. म्हातारा कुडकुडत होता. हातांत काठी होती. पण तो हातच थरथरत होता. पाय आखडल्यासारखे ताठ झाले होते.

मान वरखालीं करीत अण्णागुरुजी अडखळत म्हणाला, "पंचायतीचं म्हणणं—म्हणणं, गोष्टी कायद्यानं झाल्या पाहिजेत."

"ही वामणाची वुध अण्णा ! तुझी नाहीं दिसत." लोकं नापसंतीनं ओरडलीं.

एखादा क्षुल्लक प्रसंग असता तर अण्णागुरुजी उखडला असता. त्यानं जाम थयथयाट घातला असता. बुबुळं परतून आणि हातवारे करीत शिमगा लावला असता.

पण प्रसंग साधा नव्हता. पंचायतीच्या लोकांनीं म्हाताऱ्याला खूप समजून आणि लाख बजावून सांगितलं होतं. त्याला पक्का तयार करून धाडला होता— माथ्यांत राख घालून घेशील आणि नको तें करून बसशील ! धोरणानं वाग, जरा बेतानं बोल. गांव पेटलं आहे—

अण्णागुरुजीची कसोटी लागणार होती !

आणि तो वेतानंच बोलला. तसा धोरणानंहि वागला. आयुष्यांत प्रथमच त्यानं स्वतःला आवरलं. टाळकं थंड ठेवलं. आवाज चढूं दिला नाहीं. गंभीर चेहऱ्यानं आणि आर्जवी स्वरांत अण्णा बोलला, "अरे ही पंचायतीची वुध म्हणजे सर्वच आले. भांचोद, तीं वामणं-सुद्धां ! सगळं कसं अगदीं चोख, फस्क्लास केलं आहे पंचायतीनं. तुम्ही काळजीच नका करूं रे ! काय ? स्वस्थ घरीं जा, निर्धास्त मनानं कामाला लागा !. काय ?..."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"पण मायच्या ह्या – ह्या घाटयांचं काय ?" जमावानं एकदम आवाज उठवला.

"सांगतो ना विश्वास टाका पंचायतीवर ! निदान ह्या अण्णावर-" म्हातारा हंसत म्हणाला, "काय ? कंपनीच्या मॅनेजरलाच बोलावून घेतला आम्ही. जाब विचारला त्याला. स्पष्ट, कडक शब्दांत. गोळेसाहेब गडबडला. मान खालीं घालून आपला चोरासारखा बसला चुप्प. त्यालाहि लाज झाली होती. विनाकारण एव्हढ्या मोठ्या कंपनीचं नांव खराब झालेलं. तर बोलतोच काय ? पंचायत म्हणेल त्याला निमूट कबूल झाला. आग्रीमेन्टच करून टाकलं एक. सही घेतली मॅनेजराची. आत्तां सगळ्या गोष्टी कायद्यानं होतील बघा–"

"तुझ्या ह्या आग्रीमन्टानं धर्म्याची पोर पुन्हा जित्ती तर होत नाही अण्णा." कोणीसं वैतागानं ओरडलं.

अण्णा आवेशानं म्हणाला, "खरं ! पण काम्पेन्शन–नुकसानी घेणार ! हजार रुपये."

"अबाबा ! हज्जार– म्हणजे एकदम हज्जार–" तो आंकडा ऐकून गर्दीचे डोळे फिरले.

"शिवाय बकऱ्याचे पंचवीस—" म्हाताऱ्यानं पुस्ती जोडली.

"हें बाकी तुझं चुकलंच अण्णा." राघल्या कृष्णानं मत दिलं. हॉटेलवाला तो. हिशेब तोंडावर. तो म्हणाला, "बकरं वजनाला मणापेक्षांसुद्धां अधिकच भरलं असतं. शेराला रुपया म्हटला तरी चाळीस रूपये खरे. काय ?"

पण लोकं हजाराच्या चक्करांत पडलीं होतीं. म्हणजे काही अगदींच वाईट झालं नव्हतं. नक्त हजार ! सरळ धर्म्याच्या हातांत पडणार ! वाईट काय ? बरंच झालं होतं की !

अण्णागुरुजीनं मात्र फड जिंकला होता.

आंघोळ वगैरे आटोपून देवदर्शनासाठीं दाजी नावर वर खळनाथाच्या देवळांत गेला होता तर भेटला अनन्तभट.

दाजीनं सहज म्हटलं, "अन्तू, पूजेला उशीर झाला रे !"

दाजीच्या प्रश्नाची अनन्तभट वाटच बघत होता. त्यानं पोथी सोडली. पुराण चालू केलं. भाऊ कुळकर्ण्याच्या घरीं औदुंबराची पूजा त्याच्याकडे होती. तर तिथं बरंच कानावर आलं होतं. खरं काय न् खोटं किती ? अनन्तभटानं भारूड लावलं–

"दाजी, हें जमिनीचं प्रकरण मिटलं हां ! गुंठ्यामागं सांठ रुपये रायल्टी ठरली. म्हणजे एकराला पडले–साही चोक चोवीस आणि वर दोन शून्यं– दोन हजार चारशें ! अडीच हजारच म्हणाना! बर्षाला. आं ! ह्या खळनाथाची कृपा ! काय दाजी ? आणि त्याच्या पूजेबद्दल भटाला देतां फक्त शंभर रुपये. दाजी, हा काही न्याय नव्हे. तुम्हाला म्हणून सांगतों."

"अन्तू भटा, अरे बोलतोस काय ?"

अनन्तभटानं हंसून जाब केला, "सत्य ! त्रिवार– खळनाथाच्या पायावर हात ठेवून सांगतों. दुसरें काय ? अहो दाजी करार झाला. तुमच्या जमिनीचा वाद संपला. तुम्ही बामणांनीं कंपनीला पुरतं लुबाडलंत. गांवांत घाट्यांना थारा हवा तर गुंठ्याला साठ रुपये रायल्टी टाका ! नाहीतर जाऊंद्या कंपनी मसणांत ! तसा पक्का बेरकी बरं हा राजाभाऊ गोळ्या. राजापूरचा ब्राह्मण–पुढं घाटावर गेला. आमच्यासारखा शंवा नाहीं. पण अडला हरी, गाढवाचे पाय धरी. एक म्हण सांगितली. तर मतितार्थ, बाप दारिद्र्यापेक्षां श्राद्ध घालायला कबूल झाला हा गोळ्या. हः हः हाः हाः...."

घरीं येऊन पानावर बसला खरा, पण दाजीचं लक्ष जेवणाकडे नव्हतं.

आत्तेबाईच्या जिवाला बरं नव्हतं. स्वयंपाक बासंतीनं केला होता. दाजीच्या हें लक्षांत यायला हवं. पण नाहीं आलं.

बाजूला पाट ओढून घेऊन त्यावर बसत आत्तेबाईनं नवऱ्याला म्हटलं, "अहो, कळलं का ? आपल्या बच्छीनं जेवण केलं."

"होय, करील, ती जेवणसुद्धां करील." दाजीनं मान डोलवली. "तुमचीच लेक !"

"मग काय करणार ? बरं नाहीं मला."

"आं !" दाजीला हें मात्र आश्चर्य होतं.

"जळ्ळी फूट लागलीय् हातापायाना. कंबर धरलीय्. मुळीं उठवेनाच."

"आत्तेबाई, तुम्हीसुद्धां म्हाताऱ्या झालांत हो." दाजीनं थट्टेनं म्हटलं. आणि बायकोकडे बघून हंसल्यासारखं केलं. उगाच. डोळ्यांत भलतेच विचार चाललेले. "कान्ता, शिरोड्याला जाऊन डॉक्टरला बोलवायला हवं." बाजूला जेवत बसलेल्या कान्ताला तो म्हणाला.

"कोणी नको ! डॉक्टर न् फिक्टर– तो लाख औषध देईल. मी घ्यायला नको." आत्तेबाईनं फणकाऱ्यानं म्हटलं. म्हणजे नवऱ्याचं आपल्या बोलण्याकडे लक्ष नाहीं हें फक्त तिच्याच ध्यानांत आलं होतं.

"चुकतां बरं तुम्ही आत्तेबाई ! हें असंच काही नाही, काही नाही, म्हणत बसतां आणि अखेर जड झालं कीं डॉक्टरचासुद्धां नाइलाज होतो. टयुमर, क्षय, कॅन्सर–अहो काय एक आणि दोन रोग आहेत."

"हे श्रीमंतांचे रोग मला होणार नाहींत बरं !" आत्तेबाई उसळून म्हणाली.

बासन्ती आणि कान्ता मोठ्यानं हंसले. दाजी नावर पण हंसून म्हणाला, "अहो, रोगांना सगळींच माणसं श्रीमंत."

तो आणिक पुढं बोलणार होता, इतक्यांत बाहेर साद आली, "दाजी, अरे दाजी"–

आंचवून पंचाला तोंड पुशीत दाजी माजघरांत येतो तर बंड्या नावर, काळ्या नावर आणि त्यांचीं दोन पोरं अशा चौघांनीं त्याला दारांतच गांठला. गराडा दिला, कोल्ह्यांकुत्र्यांसारखा. खुद्द त्यांच्या घरचीं माणसं हीं—बडील भाऊ, पुतणे ! तर विश्वास तरी कसा बसावा ?

"बाळ्या, हें काय करतां रे बाबानो ?" पुढं तरी काय बोलणार दाजी ? हा प्रकार त्याला काही कळेनाच. तो आपला तोंड उघडं टाकून बघत राहिला. चकित होऊन.

बाळ्या नावरानं दम दिला, "कर मुकाट्यानं सही. कटकट नको! तुला बरं आणि आम्हाला पण."





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"सही ? सही हवी माझी ? अरे पण कशावर ?"

"करारावर ?" बंड्या नावराचा अर्धवट खुलासा. "कंपनीबरोबर तुमचीं तीं कलमं बिलमं—च्यायला बस्स झालीं दाजी. डोंगरावरची जमीन कंपनीच्या ताब्यांत गेली."

दाजीनं आश्चर्यानं विचारलं, "आं ! कशी ? कोणी दिली ?"

"कोणी म्हणजे ? आम्हीच. हक्कच आहे. त्या इस्टेटींत आमचा हिस्सा आहे. आबा गेले मरून. पण त्यांच्या नांवावर असलेल्या इस्टेटीची वांटणी मात्र अजून व्हायची आहे." वडील भावानं व्यवहार सांगितला.

आणि बंड्यानं अनुमोदन दिलं. "करेक्ट वाळूकाका ! एकदम राँईट ! इतकीं वर्षं दाजीनीं बेकायदा इस्टेट गिळली. म्हटलं चुलताच आहे, खाईना. तंटा नको. पण आत्तां मात्र वांटण्या झाल्या पाहिजेत !"

"बंड्या, खुळाच रे तूं !" बाळ्या नावर बोलला, "म्हणून तर वांटणी मागतोस ह्याच्याकडे. आबाच्या इस्टेटींत ह्याला हक्क नाहीं. त्यानं स्वतःच तो सोडला आहे. माहीत नाही तर जा जाऊन विचार ह्याच्या आईला. मांचोद हा नाही कबूल होणार."

आत्तेबाई बाजूला उभी राहून इतका वेळ नुसतीच ऐकत होती. तिला नाही सहन झालं. ती उसळून म्हणाली, "भावोजी, ह्या गोष्टींना खूप वर्षं झालींत. कूळकायद्यानंच ही इस्टेट आत्तां आमची झाली आहे. तुम्हाला ठाऊक दिसत नाही. निदान वेंगुर्ल्याला जाऊन वकीलाला तरी विचारायचं होतं."

तिचा हा टोमणा दिराला आवडला नाहीं. बाळ्यानं चिडून म्हटलं, "आत्तेबाई, पुरुषांच्या व्यवहारांत तूं तोंड घालूं नकोस. शिस्तीला सोडून दिसतं."

"वडील पडलांत म्हणून एकदां ऐकून घेतें. पुन्हा नका बोलूं. या घरांत व्यवहार बघतें मी. ह्यांना नका त्रास देऊं !"

"आत्तेबाई, खरं आहे त्याचं." हा दाजी नावर. त्याच्या सत्वशील स्वभावाला काहीतरी खटकलं, पटेना. त्यानं कबूल केलं, "इस्टेटींत मला हिस्सा नको असा शब्द दिला आहे मी."

"तुम्ही दिला असाल ! पण मी नाहीं दिलेला. आणि सांगतें देणार नाही. मेलें तरी देणार नाही. ह्या—ह्या— चांडाळांना." आत्तेबाई त्वेषानं म्हणाली, "करारावर सही ? सांगा त्यांना नाही करीत—"

"तो नाही, त्याचा बाप करील." बाळ्या ओरडला.

आणि तो सरळ धाकट्या भावाच्या अंगाला झोंबला. पाठीमागून बंड्यानं हात पकडले. बाळ्याच्या दोन्ही पोरांनीं पाय ओढून त्याला खालीं पाडला. दाजी पडला—माजघरच्या दारांतच उताणा पडला. छातीवर बसून बाळ्या त्याला धमकी देऊं लागला, "सही कर ! आधीं सही कर ! नाहीतर—"

कान्ता आणि वासन्ती रडत ओरडत बाहेर धांवली. "धांवा, धांवा, ! दाजीला मारलं—" असं ओरडत रस्त्यानं धांवत सुटलीं. शेजाऱ्या पाजाऱ्यांच्या हातापायां पडूं लागली कीं— दाजीला सोडवा, वांचवा !

पण बामणानीं त्याला वाळींत टाकला होता. आणि गांवांतील इतर लोकं बामणांच्या भानगडींत पडायला तयार नव्हतीं. आत्तां तसं कोणी बोलत नव्हता खरा ! पण अर्थ तोच ! एक नाही दोन, तोंड फिरवून जो तो घरांत जाई, दार लावून घेई. अण्णागुरुजीनं तर वासंतीला सांगूनच टाकलं, "दाजीला सही कर म्हणावं ! तेंच बरं ! आणि बरोबर पण !"

आत्तेबाई इतकी धीराची ! पण ह्या पाशवी प्रकारानं तीसुद्धां सुन्न झाली, छिन्न झाली ! वाईट—वाईट म्हटलं तरी माणूस कुठल्या थराला जाईल ? हा—इतका ? छी :! कल्पना नव्हती तिला. म्हणूनच आश्चर्य झालं. काळीज रक्तबंबाळ झालं. अंतःकरण थिजून अन् झिजून गेलं.

काही क्षणच !

आणि ती सावध झाली.

नाहीं ! आत्तां ती एकटी नव्हती, असहाय्य नव्हती, अगतिक नव्हती. तिचं कूंकू कपाळाला होतं, गळयांत मंगळसूत्र होतं. हातीं वज्रचुडा होता. होय !

आत्तेबाई स्वतःशींच पुटपुटली, "खळनाथा देव तूं ! पण आहेस कुठं रे ?"—

खळनाथ—तिच्या घरचा देव— कुठंतरी नाही, तिच्या पाठीशींच उभा होता. कदाचित् तिच्या हृदयांत— देहांतही ! त्यानंच तिला इतकं बळ दिलं. उगाच नाहीं ! आढयाचा अडसर हिसक्यांत ओढून आत्तेबाई ओरडली, "खबरदार ! सोडा ह्यांना ! निघा इथून— चालते व्हा म्हणते ना !"

हा स्वर तिचा नव्हता. काही वेगळाच होता. आग्रही, हुकमी, निर्वाणीचा.

बाळ्या नावरानं चमकून तिच्याकडे बघितलं. आणि तसा बंड्या चुलतीला अडविण्यासाठी शिकारी कुत्र्यासारखा ताडकन् उडी टाकून धांवला.

पण जी आत्मसमर्पणाला सिद्ध झाली आहे तिला कोण रोखणार ? कळी-काळालाहि तें अशक्य आहे !

वादळवाऱ्यानं झाडाची फांदी मोडावी तसा आत्तेबाईनं बंड्याला बाजूला लोटला. तो धडपडत पुढील दारीं कठड्याला जाऊन आदळला. कळलंहि नाही, कसा न् केव्हां ! आत्तेबाईचा उग्र चेहरा आणि रुद्र अवतार बघूनच बाळ्या नावरांची दोन्ही वांड कारटीं थंड झालीं. बापा टाकीत तीं बापाला म्हणाली, "बाबा, पुरे—पुरे हो ! आत्तेबाईचं लक्षण ठीक नाहीं दिसत."

बाळ्या गुरगुरला, "मरेना रे ती ! पण सही केल्याशिवाय ह्याला नाही सोडणार. मग पोंचवायला जावं लागलं तरी—"

पण आत्तेबाईनं त्याला पुढं बोलूंच दिलं नाहीं. अडसर टाळक्यांत बसून कपाळमोक्षच व्हायचा ! पण नशीबाचा मक्कम ! बाळ्या नावर वेळींच बाजूला झाला. आत्तेबाईनं हाणलेला अडसराचा तडाका त्याच्या उजव्या खांद्याला निसटता लागला. उलटून तो भाव-जयीच्या अंगावर आला. "चांडाळणी, दिराचा जीव घेतला असतास."




अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आत्तेवाई नुसतीच हंसली. मोठ्यानं, विकटपणं. भ्रमिष्ठासारखी— तिला कशाची काही शुद्ध नव्हती. कोणालाच ती ओळखत नव्हती, जाणत नव्हती. स्वत:ला किंवा दुसऱ्यालाहि. विकार, विचार, आचार— सर्व एकांत एक गुंतून भरडून आणि भरकटून गेले होते. ती बेफाम होती, बेभान होती.

दुसरा तडाखा मात्र वाळचा नावराच्या बरोबर पाठींत बसला. चांगला जोराचा. तो केवढ्यानं तरी ओरडला. डोळ्यासमोर काजवे जमले. जमीन फिरूं लागली. कसा बसा तो पोरांना ओरडला, "बघतां काय ? अरे निराकार हें ! नाही आटोपणार—पळा—"

आणि मग थांवतो कशाला ? धुम पळत सुटला. पुढं वाळचा नावर आणि मागं नावरांचीं हीं तीन पोरं.

दाजीनंच धडपडत उठून बायकोला आवरलं. तिच्या हातांतील तो जड अडसर काढून घेतला.

आत्तेवाई ओक्साबोक्सी रडत त्याच्या पायावर कोसळली. सांगूं लागली, "अहो— अहो मला वरं नाही वाटत. होतंय्—काहीतरी होतंय् !....पोटांत इथं— इथं कळा लागल्यात, दुखतंय्...खूप— मरणाचं ! नाही, मला मरायचं नाही. दाजी नावर, मरूं देऊं नका मला——"

**दोनचार** दिवस आत्तेवाईनं सर्वांना हलवून टाकलं. घरांत नवऱ्याला आणि दोन मुलांना आणि बाहेर उभ्या गांवाला. कसलं दुखणं घेऊन वसली होती देव जाणे ! शिरोडयाच्या डॉक्टरानं तपासून सांगितलं, "काळजी करूं नकोस आत्तेवाई ! तूं मरत नाहीस. जरा ब्लड् प्रेशर वाढलंय्. वाकी सगळा तुझ्या मनाचा खेळ. आतां तोच अधिक वाईट—काय ?"

आत्तेवाई डॉक्टरलाच दोष देई. म्हणे, "त्याला नाही कळत. ढोरवैद्य तो. हिथं मला काय यातना होतात, किती सहन करावं लागतं त्याला काय माहीत. मलाच माहीत. काही नाही, जरा ब्लड प्रेशर वाढलं आहे म्हणतो. हूं :! उद्यां मेलें तरी हा डॉक्टर म्हणेल ढोंग करते आत्तेवाई."

चौकशीला आलेलीं लोकं म्हणत, "आत्तेवाई, तूं नसता ताप करून घेऊं नकोस हां ! गप्प पडून रहा."

तसा तिनं अधिकच त्रागा करावा, "पडून राहू ? आणि घरचं कोण बघणार ? ते राक्षस टपलेत रे ? ह्यांना पुरते लुटतील. नाही—नाही ! मलाच पाह्यलं पाहिजे, मलाच केलं पाहिजे, मलाच मेलं पाहिजे...."

तिचा आजार वाढत चालला होता. डॉक्टरचं औषध चालूं होतं. पण गुण नव्हता. कमरेची आणि पोटांतील दुख कमी होण्याऐवजीं जास्त झाली होती. त्या कळा एकदां सुरू झाल्या कीं मग थांवता थांवत नसत, तास न् तास आत्तेबाई वळवळत अन् तळमळत पडे. तोंडानं सारखं चाललेलं असे, "अग आई ग ! अरे देवा रे !"

विचारीं लेकरं ! केविलवाण्या तोंडानं एकमेकांकडे बघत बसत. रडत आईला म्हणत, "नको ग असं करूंस आई ! आम्हांला कससंच होतं." खरं होतं त्यांचं. आई अशी अंथरुणाला खिळून पडलेली हीं पोरं प्रथमच बघत होतीं. वाईट विचार गर्दी करीत. मुलं धावरून जात. अशांत भेटायला येणारीं लोकं एक एक मलतंच वोलत बसत. चौकशीच नाही, तर चांभारचौकशा सुरू करीत. धीर देण्याऐवजीं नाही नाही तें सांगून काळजी लावून जात. वाळचा नावर गांवभर वोलत होताच, "अरे, आहे माझा. खळनाथ जागा आहे. टाळक्यांत अडसर घातलान् माझ्या. तें कर्म आतां भोग म्हणावं !" त्याची बायको तर जावेच्या नांवानं कडाकडा बोटं मोडीत होती. शिव्याशाप देत म्हणे, "दुसऱ्याची इस्टेट गिळूं बघते सटवी. पण नाहीं पचणार ! माझा देव पचूं नाहीं देणार. वळवळून मरेल. किडे—किडे पडतील.——"

आत्तेवाई आजारी, म्हणजे घरची जबाबदारी वासन्तीवर पडली होती. सगळं तिलाच बघावं लागे. दिवस आईच्या मागं आणि स्वयंपाकपाण्यांत जाई. कामाच्या रगाड्यांत बिलकुल उसंत मिळत नव्हती. काही ना काही सारखं चालू असे. पोरीला जमत नसे. दगदग होई, जीव हैराण व्हायचा !

एक मात्र वरं होतं ! विचार करीत बसायला वासन्तीला सवड नव्हती. आणि तरीहि वेळूच्या वनांत वाऱ्याची शीळ घुमावी तसा तो एकच एक विचार तिच्या हृदयांत ठाव घेऊन होता. कधीं सहज वरवर, कधीं खोल दूरवर. आणि मग घर तिला खायला उठे. त्या त्याच आठवणी उलूं आणि सलूं लागत. चतुरासारखं चित्त किरमिजी उन्हांत भिरभिरूं लागे. आंतल्या आंत, पंख गळून पडेस्तोंवर-आणि वासन्ती अधिकच अस्वस्थ होई, कावरीबावरी होई.

तिच्या आईकडे सगळीं—सगळीं माणसं येऊन गेलीं होतीं. माऊ कुळकर्ण्यांचा द्वारकानाथ तर रोज नेमानं चक्कर मारून जाई. एरव्हीं कित्तीं कामं असायचीं त्याला. जेवायला वेळ नव्हता. तोच सांगे. तिची आई वेड्यासारखी ह्या द्वारक्याकडे नको त्या गोष्टी काढून बसे. लेकीच्या लग्नाच्यासुद्धां. एकएक काहीतरीच ! वासन्तीला मात्र चोरट्यासारखं व्हायचं, लाजलाजून कससंच होई !

आणि आला नव्हता एकटा तो—येणारहि नव्हता. होय ! मलतीच मिजास ह्या विजयला. एक नंबरचा आखडू. हूं :! आणि ह्याच्याठीं वासन्ती सगळं, सगळं सोडायला तयार होती. घर, दार, जात, मायेचीं माणसें— पण ह्याला कुठं होती पर्वा ? नव्हतीच मुळीं. म्हणून तर चिडला, असा उखडला. तिचं काय चुकलं होतं ? विजय तिच्या जातीचा नव्हता, त्याचं घराणं तिच्या तोलाचं नव्हतं, त्याचीं लोकंसुद्धां अगदींच— खरंच होतं ! तिच्यावर विनाकारण रागवला होता विजय. गेला उडत ! त्याला नाही— मग वासन्तीसुद्धां त्याची पर्वा नव्हती करीत !

होय !— आणि तरीसुद्धां ती विजयची वाट बघत बसे. रस्त्यानं जाताना कदाचित् तो दिसेलसुद्धां म्हणून संध्याकाळला पुढील दारीं तास न् तास उभी राही. तिला वाटलं होतं आई आजारी असल्याची बातमी कळल्यावर तरी विजय आल्याखेरीज रहाणार नाही...पण नाही, विजय नाही आला—येणार नव्हता.

वासंतीनं खूप वाट पाहिली होती....


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

एक दि़वस दाजीनंच लेक़ीला घराबाहेर काढलं. म्हटलं, "जरा बाहेर भटकून ये– मोकळ्या हवेंत. नाहींतर तूं सुद्धां आजारी पडशील."

"पण आईपाशीं–" वासंतीनं विचारलं.

"आहे मी. तिचाच नवरा." दाजीनं सांगितलं आणि तो मोठ्यानं हंसत सुटला.

आत्तेबाईलासुद्धां हंसूं आलं, "जळ्ळं मेलं ! अहो, वयाकडे तरी बघा.:"

* * *

हिवाळ्यांत काळोख पांचलाच पसरतो. वर उ़जाड रानांत त्या मानानं चांगलाच उजेड होता.

खाणी सुटल्या होत्या. सुरुंगांची वेळ झाली होती. इशाऱ्याचा भोंगा वाजत होता. खाणीवर चिटपाखरूंसुद्धां नव्हतं. सगळा शुक-शुकाट. एकटी वासन्तीच त्या आडवाटेनं पलिकडच्या कंपनीच्या हापिसाकडे चालली होती.

तिचं भोंग्याकडे लक्ष नव्हतं. चित्त टाळ्यावर असेल तर ना? तें कुठंतरी गहाण पडलं होतं. अणि तिच्याकडे तर गहाणपत्रसुद्धां नव्हतं.

बाजूला दारूला बत्ती मिळाली. धडाधड् स्फोट सुरू झाले.... आणि आत्तां वासन्तीच्या ध्यानांत आलं. इतक्या उशीरां ! आणि भिऊनच पोर गोंधळली, घोटाळली. पुढं अन् मागं, अवतीं अन् भोवतीं सुरुंग फुटत होते. खालीं जमिनीच्या चिरफळ्या उडत होत्या. खडकांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होत होत्या––

तिनं जिवाची आशा सोडली. देवाचं तरी नांव घ्यावं ? पण नाही, तेंहि सुचेना. दगडामातीच्या उसळत्या ढिगाऱ्यांतून आणि वरून अंगावर कोसळूं बघणाऱ्या दरडींतून डोळे मिटून तडक वासन्ती धांवत सुटली. तोंडानं जप चालला होता, "विजय, विजय––"

विजयनंच तिला वांचवली. सुरुंगांची मजा बघत तो उभा होता. आणि लक्ष गेलं. वासन्तीकडे. सुरुंगाचा भडीमार चालला आहे तर ही चक्कर पोर त्यांतून अशी अन् तशी धांवतेय्. पाहिलं मात्र आणि तिरासारखा विजय धांवत सुटला. बेशक उडत्या सुरुंगांतून घुसून त्यानं तिला पकडली. ओढत बाजूला सुरक्षित ठिकाणीं नेऊन उभी केली.

आणि मग वैतागानं त्यानं तिच्या थोबाडींत दिली. "मरायचं होतं वाटतं."?

थोबाडींत बसली तशी वासन्ती माणसांत आली, "तूं– तूं विजय? खरं नाही वाटत. स्वप्न वाटतं रे ?"

"नशीब तुझं म्हणून जिवंत आहेस."

"होय ना ! आणि समोर तूं, असा जवळ ! नशीबच– भाग्य, माझं ! पण तूं कीं नाही अगदीं वाईट आहेस– निर्दय, दुष्ट !" लाजभीड सोडून वासन्तीनं एकदम त्याच्या गळ्याला मिठी मारली.

"वसू, वेडी तर नाहींस ?" भारावलेल्या जाड आवाजांत विजय म्हणाला.

"असूं दे ! बायका वेड्याच असतात !" मुसमुसत ती पुटपुटली. त्याच्या छातीवर डोकं टेकून हळूच म्हणाली, "कधीं कळायचं रे तुला ?"

विजयनं कडवट स्वरांत विचारलं, "कळून काय करायचंय्?"

"लग्न." वासन्तीनं बेफामपणं उत्तर दिलं," म्हणत असशील तर आत्तां या क्षणीं!"

दोघांचंहि आजूबाजूला लक्ष नव्हतं. तें असतं तर तळपीवर सागाच्या बोडक्या झाडापाशीं गर्दी झालेली त्यांना दिसली असती. लोकं त्यांच्याकडेच बघत होतीं. बोटं दाखवून कुजबुजत होतीं. द्वारकानाथ कुळकर्णी, बंड्या नावर अशी गांवची गद्धेपंचविशी गोळा झाली होती.

तिकडे लक्ष गेलं प्रथम वासंतीचं. आणि तशी ती ताडकन् बाजूला झाली. पायाला नाग डसावा तशी किंचाळली, "मेल्या, सोड– सोड मला. रानांत एकटी बघून हात धरतोस ? शरम नाहीं वाटत?"

एकाएकीं हिचं टाळकं फिरलं कीं काय– विजयला कळेना. तो बघतच राहिला.

वासन्ती ओरडतच होती, "धांवा, धांवा हो कोणीतरी ? हा चांडाळ अब्रू घेतोय् माझी. शेण घाला याच्या तोंडांत."

हा काय प्रकार आहे तें कळण्यापूर्वीच द्वारक्याचं टोळकं विजयच्या अंगावर एकदमच तुटून पडलं. त्यांनी त्याला जमिनीवर पाडला. आणि बेशुद्ध पडेस्तोवर यथेच्छ बडवला. द्वारक्यानं त्याच्या तोंडांत माती घातली; आणि मग बंड्यानं एक मोठा धोंडा उचलून विजयच्या पायावर हाणला.

झालेला अनर्थ आत्तेबाईला कळला तेव्हा कपाळावर हात मारून घेत ती उसळली, "कार्टे, आग लावलीस घराला. नावरांच्या नांवाला डांबर फासलंस."

आणि मग पोटांत कळा येऊन ती वळवळत पडली, "आई ग ! अरे देवा––"

( क्रमशः )


# ऑगस्ट !

१५ ऑगस्टचा स्वातंत्र्य दिन म्हणजे भारतवर्षाच्या इतिहासांतील एक बहुमोल सोनेरी पान.... स्वातंत्र्योदय याच दिवशीं झाला........

या स्वातंत्र्याची स्मृति प्रज्वलित करण्यासाठीं....

# दीपावलीचा

ऑगस्ट ● स्मृति ● अंक

आपल्या सर्व वैशिष्ट्यासह प्रसिद्ध होणार ! किंमत नेहमीची

दर्जेदार दिपावलीचे वर्गणीदार व्हा







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

**❀ म हा ❀ ❀ या त्रा ❀**



# राजधानींतील तो प्रलयंकारी दिवस

**मधली** सुटी. दोन वाजलेले. ऑफिसांतून बाहेर पडलेली मंडळी ऑफिसांत परतत होती. तरी पार्लमेंट स्ट्रीटवर मधून मधून थवे. साऱ्यांचे नित्याचे अुद्योग सुरू—पान-सिगारेट घेणें व दोन पैसे ग्लास कूलरचें पाणी पिणें. आइसफ्रूट-आइस्क्रीम खाणें. काकडचा छोले-मटूरे चापणें. पोलिस दिसतांच दुकान उचलून पळतां यावें या बेतानें उभ्या असलेल्या विक्रेत्यांच्या फडक्यांतून स्वस्त रुमाल बुशशर्ट निवडणें. घोळक्या घोळक्यांत बोलणें चाललेलें. विषय एकच. पंडित नेहरूंची प्रकृति. कालच सायंकाळीं पंडित नेहरू डेहराडूनहून परत आले, आणि आजच सकाळीं त्यांना हृदयविकाराचा झटका आला. ही गोष्ट प्रत्येकाला ठाऊक. तशी नेहरूंची प्रकृति भुवनेश्वर अधिवेशनापासून ढांसळलेलीच. तशी सुधारत आहे. सुधारेलच म्हणा. पंडितजींची इच्छाशक्ति जबर; तडफ दांडगी. डॉक्टरचा सल्ला झुगारून ते कामाला लागतात. संसद सदस्यांची प्रेमळ विनंति न मानतां ते हट्टानें संसदेंत उभे राहून बोलतात.

पण आज संसदेंतच नंदा-कृष्णम्माचारींनी दीड दोन तासांपूर्वींच जाहीर केलें होतें की पंडित नेहरूंची प्रकृति काळजी वाटण्याइतकी बिघडली आहे. रेडियोने बातम्यांत हेंच जाहीर केलें. म्हणून सर्वांनाच काळजी. मधल्या सुटींत खाणींपिणीं करीत असतांनाहि सर्वांना आज बोलायला तोच एक विषय. पार्लमेंट स्ट्रीटवर मधल्या सुटींत पसरणारें नेहमीचे खेळकर वातावरण आज मंदावलें. हवाहि आज जरा कुंदच. उकाडा वाढत आहे. क्षितिजाच्या कडेशी भुरके ढग आहेत. आंधी (धूळवादळ) येणारसें दिसतें.

रेडियो स्टेशनसमोरच्या एका निंबाच्या झाडाखालीं मी उभा. आज एकटाच. सोबतीला पंडित नेहरूंच्या प्रकृतीची काळजी.

मा. कृ. पारधी

सकाळीं ऑफिसांत आल्याबरोबर सहकाऱ्यानें पहिली बातमी दिली ती हीच. सकाळच्या वृत्तपत्रांत कांहीं नव्हती. पण अकरा वाजतां सगळीकडे ही बातमी पसरलेली, तरी तिचें विशेष कांही वाटलें नाहीं. ऑफिसच्या कामांत कांहीं व्यत्यय आला नाहीं. संसदेंत प्रकृतीबद्दल निवेदन झाल्याचें बारा वाजतां कळलें. तरी दीडपर्यंत काम करीत बसलों. सगळ्यांनीच केलें. मग ताजी खबर मिळवण्यासाठीं समोरच रेडियो स्टेशनवर गेलों. पंडितजी अत्यवस्थ असल्याचें प्रत्यक्ष रेडियोवरून ऐकलें. मग त्या बातमीचें सांवट मनांत पसरलें. उगीच हुरहूर वाटली. बाहेर निंबाच्या झाडाखालीं उगीच उभा राहिलों.—समोरचे घोळके पहात. उन्ह भगभगीत आणि बैराण वाटलें. वारा पडलेला. डोळयांना रखरख जाणवली. वाटलें; आजच्या वातावरणांत कांही तरी वेगळें आहे. नेहमीचे कांही तरी आज नाहीं. म्हणून आज जरा सुन्न वाटतें.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तेवढ्यांत एक गृहस्थ माझ्याजवळ आला. असाच कुठल्या तरी ऑफिसांतला असावा. ओळखीचा नव्हता. जवळ येऊन, कानांत कुजबुजल्यागत हळू आवाजांत म्हणाला, "पंडितजी चल बसे." त्याचा आवाज कोरडा होता.

असें कसें होईल.? ते काय आज पहिल्यांदाच आजारी पडले होते ! इतक्या चटकन मृत्यूला वधणारा माणूस नव्हे तो. मग हा अनोळखी इसम असें कां सांगतो ? लोकांना अफवा उठवण्याची वाईट संवय.

"खरंच ?"

"होय आतां मी रेडिओ स्टेशनमधून हें ऐकतच येत आहे." पुन्हा त्यानें तितक्याच हळू कोरड्या आवाजांत सांगितलें. आणि सांगतां सांगतांच चालायला लागला.

नेहरूकाका गेले ! खरेंच? खरेंच.

हें मनांत मावत नाहीं. एवढी मोठी बातमी कशी पचवायची ? हें कोणाला तरी सांगितलेंच पाहिजे. हें कोणाला तरी सांगितल्याशिवाय खरें मानणें कठीण आहे.

पण कसें सांगायचें ? खोटें असलें तर ? इतकें अभद्र खोटें बोलूं नये.

पण खरें असो, खोटें असो. त्या अनोळखी माणसाचें असेंच झालें असेल. त्याच्या मनांत मावलें नाहीं तें सांगून टाकण्यासाठीं त्याला ओळखीची गरज वाटली नाहीं.

तडक मी माझ्या ऑफिसाकडे धावलों. समोर एक ओळखीचा माणूस भेटला. त्याला थांबवून हळूच सांगितलें, 'नेहरूकाका गेले'. तो तितक्याच हळू आवाजांत खिन्नपणें म्हणाला, 'होय. आताच समजलें. आता कसें होईल ?'

मनांत मावत नव्हतें तें बोलण्याला हिय्या आला. भेटेल त्याला ओरडून सांगावेंसें वाटलें, 'नेहरूकाका गेले'. फक्त एवढेंच. आणखी कांही बोलावेंसें वाटत नव्हतें.

आणि मी भेटेल त्याला सांगत सुटलों. पण कोणालाच ही बातमी नवी नव्हती. प्रत्येकानें ती नुकतीच ऐकली होती. पण कोणीच फारसें बोलत नव्हतें. कामावर कोणाचें लक्ष नव्हतें. एकमेकाला एकमेक सांगत होते 'पंडितजी गेले.' कोणी कोणाच्या ओळखीचा विचार करीत नव्हतें. तरीहि एक दुसऱ्याशीं जिव्हाळ्यानें बोलत होता. आपल्या मर्मावर झालेला आघात जिव्हाळ्याच्या माणसांजवळ व्यक्त करावा इतक्या जिव्हाळ्यानें. ओळखी-अनोळखीचे, औपचारिकतेचे सारे बंध गळून जणुं एकमेकांच्या भावना एकरूप झाल्या होत्या. एका ठरीव आवाजांत अेक दुसऱ्याची भावना बोलून दाखवीत होता– 'पंडित नेहरू गेले !'

हळू हळू गडबड वाढूं लागली. बोलणें फारसें वाढलें नाहीं. पण हालचाल वाढली. कोणी आपल्या जागा सोडून दुसऱ्याच्या खोलींत गेले. कोणी इकडून तिकडे हिंडूं लागले. कोणी ऑफिस सोडून बाहेर गेले. कोणी कोणाकडे खास लक्ष दिलें नाहीं. जणुं प्रत्येकजण आपल्याच नादांत होता. कोणी कोणाला ओळखत नव्हतें. प्रत्येकाचें कांही हरवलें होतें आणि तें तो स्वत:शीच शोधीत होता. दुसऱ्या कोणाचें त्याला भान नव्हतें. पंडित नेहरू गेले या उद्गारांतील भावनेपलिकडे कोणीच कोणाचें कांही लागत नव्हता.

तेवढ्यांत एका जणानें पळतां पळतां सांगितलें, 'आतां राष्ट्रपति घोषणा करणार आहेत. त्या खोलींत रेडियो आहे.'

वरेच जण पळत त्या खोलींत जमलों. सारे तटस्थ उभे. कोणीच कोणाशीं कांही बोलत नाहीं. जीव कानांत आणून उभे. रेडियो सुरू झाला. कबीराचें भजन– 'हा संसार परदेश आहे. तो सोडून स्वदेशीं जायचें.' कोणाच्या पापण्या ओल्या झाल्या. भजनांमागून घोषणा झाली, 'थोड्याच

## नेहरू असे होते.....

☆ जवाहरलाल हा माझा वारस होईल. माझी भाषा त्याला समजत नाहीं असें तो म्हणतो. पण दोन अंत:करणांच्या मीलनांत भाषेचा अडथळा होत नसतो. मी गेल्यानंतर तो माझीच भाषा बोलेल याची मला खात्री आहे. त्याचें चारित्र्य स्फटिकाहून अधिक स्वच्छ आहे आणि त्याच्या प्रामाणिकपणाविषयीं संशयाला जागा नाहीं. राष्ट्र त्याच्या हातांत पूर्ण सुरक्षित आहे.

**–म. गांधी**

☆ भाईपासून मी ज्या अनेक गोष्टी शिकलें त्यांत सर्वांत महत्त्वाची मला वाटते ती ही कीं जीवनाचे वेगवेगळे कप्पे पाडून तें जगवायाचें नसतें. वैयक्तिक आणि सामाजिक जीवनांत आचरावयाचीं तत्त्वें एकच असतात आणि एकाचें प्रतिबिंब चटकन् दुसऱ्यांत उमटतें.

**–विजयालक्ष्मी पंडित**

☆ म. गांधींनीं पं. नेहरूंना आपले राजकीय वारस निवडलें आहे. या पदासाठीं अत्यंत सुयोग्य व्यक्ति निवडली गेली आहे हें पाहून फार समाधान वाटतें.

**–सरदार पटेल**

☆ भारत हा आणीबाणीच्या परिस्थितींतून जात असतां या महापुरुषानें जन्म घेतला आणि आपलें कर्तव्य चोख प्रकारें पार पाडलें.

**–डॉ. राजेंद्रप्रसाद**

☆ जातीजातींतील, राष्ट्राराष्ट्रांतील व विविध पंथ-प्रणालींतील दुरावा नष्ट करण्याचा पं. नेहरूंनीं मनापासून प्रयत्न केला. त्यामुळेंच त्यांचें नांव त्रिखंडांत गाजतें आहे.

**–डॉ. स. राधाकृष्णन्**

☆ पं. नेहरूंइतका दुसरा लोकप्रिय पंतप्रधान दुसरा कुठलाच झाला नसेल. मुलांचे ते चाचानेहरू असत. बौद्धिक वर्गांत त्यांना लेखक म्हणून मान मिळे. भारताचा पुन: नव्यानें शोध घेणारे ते एक महान दर्शनिकहि होते.

**–आचार्य कृपलानी**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

वेळापूर्वी आपले पंतप्रधान नेहरू स्वर्गवासी झाले हें कळवण्यास अत्यंत दुःख होतें. आतां थोड्याच वेळांत राष्ट्रपति संदेश देतील.' सर्वांनी कान टवकारले. पुन्हां भजन. कांहीशा अशुद्ध उच्चारांत गीतापाठ. नंतर कुराणपाठ. पांच पांच मिनिटांनी तीच स्वर्गवासाची घोषणा, राष्ट्रपतींच्या संदेशाची सूचना.

वेळ रेंगाळत गेला. शिगेला पोचलेली अधीरता हळूच कुजवुजूं लागली. ताठ खडे असलेले पाय एकामागून एक सैल उभे राहूं लागले. चुळवूळ सुरू झाली. कांही पाय खोलीबाहेर पडले. आवरलेले श्वास मोकळे होऊं लागले. उत्सुकताहि शेवटीं उवगतेच.

आणि मग पुन्हां एकदां रेडियो बोलूं लागला. लांबलचक बोलत राहिला. देशभर वारा दिवस सुतक...आज-उद्यां सुटी... पंतप्रधान-निवासाचे दरवाजे अंत्यदर्शनासाठीं उद्यां सकाळीं आठवाजेपर्यंत खुले...आठ वाजतां प्रेतयात्रा....राष्ट्रपति आपला संदेश आज रात्रीं साडेआठ वाजतां देतील.

सर्वांची निराशा. अर्धा तास ताटकळत ठेवून राष्ट्रपति कांहीच बोलले नाहींत. या क्षणीं त्यांनी कांही तरी बोलायलाच हवें होतें. प्रत्येकाच्या अंतःकरणांतील मूक वेदना त्या क्षणीं त्यांचे शब्द ऐकण्यासाठीं आसुसलेली होती. राष्ट्रपतींनी फार निराशा केली.

या वेळीं कां बोलले नाहींत राष्ट्रपति ? कांहीं राजकारण आडवें आलें असेल. ही का राजकारण करण्याची वेळ होती ? यावेळीं लोकांच्या ताणलेल्या दुःखभावनेवर नुसता अेक प्रेमाचा, दिलाशयाचा शब्द हवा होता. 'पंडित नेहरू गेले' एवढेंच सांगून राष्ट्रपतींनी लोकांच्या दुःखांत भागीदार व्हायचें होतें. राजकारण भावनांचा असा चोळामोळा करतो.

मग चर्चा. राष्ट्रपति कां बोलले नसतील ? त्यांना कसला पेंच पडला असेल ? राज्य आपल्या राज्यघटनेंत काय लिहित आहे ? मोठा अपेक्षाभंग झाला की मन पाखंडी बनतें, कडवटपणें टवाळी करतें. त्या तारेंत कोणी तर्क करूं लागले.

धडाधड खोल्यांना कुलुपें लागलीं आणि सारे बाहेर पडले.

* * *

रस्त्यांवर माणसांची रीघ लागली. गर्दी वाढूं लागली. साऱ्यांची धाव पंतप्रधानांच्या कोठीकडे– तीन मूर्तीला.

सूर्य कलत गेला तसे रस्ते अधिकाधिक भरून वाहूं लागले. दिल्लींतील सगळे रस्ते एकाच ठिकाणीं जात होते. मोटारी, स्कूटरें, टांगे, सगळ्यांची धाव त्याच ठिकाणीं. पंडितजींच्या कोठीकडे.

संध्याकाळ होत आली तशी आंधी आली. धुळीचे लोळ आकाशभर पसरले. सारें वातावरण मळकट धुळकट झालें. हळू हळू ढग जमूं लागले. सौथ अॅव्हेन्यूला माणसांचें वारूळ फुटलें. तेथील तीन-मूर्ति पुतळ्यामागील पंडितजींच्या कोठीपुढें लाखो माणसांची गर्दी वाढूं लागली. आकाशांत धूसर मेघांची दाटी झाली. धुळीचे कण घेऊन वारें पिसाट वाहूं लागलें. तीन मूर्ति भोवतीचें वातावरण गजबजलेलें, कोंडलेलें, अस्वस्थ वाटूं लागलें. पाऊस येईल तर बरें होईल. जरा मोकळें वाटेल. मनांत गुदमरल्यासारखें होतेंच. जरा मोकळें वाटायला हवें. सर्वांनाच हवें.

लोक कोंडी फोडूं पाहताहेत. पंडितजींच्या कोठीचे लोखंडी कांबींचे भव्य दरवाजे बंद आहेत. शेकडों पोलिसांनी तीन मूर्ति गोला– भोवती कोंडाळें करून लाखो लोकांना थोपवून धरलें आहे. सात वाजतां दरवाजे उघडणार आहेत. तोंपर्यंत फक्त वड्यांना आंत जातां येते. मोटारींची रीघ लागली आहे. दिल्लींतील सगळे वडे, देश-परदेशचे, मोटारींचे

## परदेशीयांना पं. नेहरू असे वाटत

☆ माझ्या मतें पं. नेहरूंच्या ठिकाणीं पौर्वात्य व पाश्चिमात्य कल्पनांचा सुरेख संगम झाला आहे.

**–लॉर्ड अॅटली**

☆ त्यांच्या सहवासांत आल्यामुळें मी अधिक शहाणा, अधिक चांगला व अधिक प्रगल्भ झालों.

**–क्वामे नक्रुमा**

☆ कालप्रवाहाला विशिष्ट दिशेनें गति देणारीं जीं कांहीं मूठभर माणसें जगांत निर्माण होतात त्यांतले पं. नेहरू एक होते. राजा होण्याची कला त्यांना अवगत होती. अनेकांचीं अंतःकरणें आपल्या लेखणीनें, वाणीनें हलवून सोडण्याचें सामर्थ्य त्यांच्याजवळ होतें.

**–अॅडलाय ई. स्टिव्हन्सन**

☆ विचार आणि भावना यांचा समतोल पं. नेहरूंच्या ठायीं होता. त्यांच्या परराष्ट्रीय धोरणाचीं तीन मूलभूत तत्त्वें पुढील पिढ्यांच्याहि स्मरणांत राहतील.

**–ऊ. नू.**

☆ भारताचें भविष्य उज्ज्वल व्हावें म्हणून प्राणपणानें प्रयत्न करणाऱ्या या नेत्याचा राष्ट्राला अभिमान वाटायला हवा. शांततामय सहअस्तित्व व आंतरराष्ट्रीय सहकार्य यांवरील निष्ठेमुळेंच पहिल्या प्रतीचे राजकारणी पुरुष म्हणून जगांत त्यांना मान आहे.

**–मार्शल टिटो**

☆ असुरक्षिततेच्या भीतीची गडद छाया जगावर आलेली असतांनाहि शांततेचें व शहाणपणाचें प्रतीक म्हणून पं. नेहरू ठामपणें उभे आहेत. प्रकाशाचा मार्ग दाखविण्यास तेच आपणांस सहाय्यकारी होतील.

**–बर्ट्रान्ड रसेल**

☆ टेलिव्हिजनवर पं. नेहरू विलक्षण उमदे, मनमोकळे वा तरुण दिसले. अमेरिकेच्या जनतेला ते प्रथमपासूनच प्रिय आहेत व पुढेंहि प्रिय राहतील.

**–पर्ल बक**

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पोंगे वाजवीत, वाट काढीत, पंडितजींच्या अंत्यदर्शनाला जात आहेत. राजकारणी बड्यांचीं आंत खलबतेंहि सुरू असतील. बाहेर जनसागर भराला येत आहे. मधूनच पोलिसांचें कोंडाळें फोडून शे-पन्नास लोकांची लाट त्या काळ्या विशाल दरवाजांच्या रोखानें धावत सुटते. तिला रोखण्यासाठीं पोलिसांचें बळ इकडे वाढतांच तिकडे शे-पन्नासांची दुसरी लाट सैरावैरा फुटते. एखादा पोलिस अधिकारी मग आपल्याच शिपाई गड्यांवर कातवतो. मग शिपाई गडी जरा नेटानें लोकांना थोपवण्याचा प्रयत्न करतात.

सात वाजेपर्यंत हें असेंच चालणार. जनसागराचें हेलावतें मन सात वाजेपर्यंत असेंच कुंद राहणार. पाऊस येईल तर जरा मोकळें वाटेल.

क्षणाक्षणाला वाढत जाणाऱ्या या जनसागराचें दर्शन घेऊन मी परत फिरलों. सध्यांतरी नेहरूकाकांचें दर्शन घेण्याचा हव्यास व्यर्थ. सात वाजतां दरवाजे उघडले की लोकांचा लोंढा त्या दरवाजांत जाऊन आदळणार. लोकांना धीर निघणार नाहीं. मोठी रेटारेट होईल. ती पहा, राष्ट्रपति भवनाच्या दक्षिण दरवाजापासून लोकांची मुंग्यांसारखी झुंबड तीन मूर्तिपर्यंत सरकत आहे. लोकांचा पूर जरा ओसरूं दे. या भाऊ गर्दींत नेहरूकाकांचें दर्शन नको. तें दर्शन घेतांना मन इतकें शांत नि निवांत असावें की त्यांत नेहरूकाकांचें प्रतिबिंब स्वच्छ उमटेल, आणि मग तें कधींच मिटणार नाहीं. कारण नेहरूकाका पुन्हां दिसायचे नाहीत—

या विचारानें मला ढवळून आल्यासारखें वाटलें. तोंच पावसाचे टपोरे थेंब अंगावर आले. वाऱ्याला एकदम लहर आली—ओलसर, गारशी.

थोड्या वेळानें अंधार झाला. अंधार झाल्यावर पाऊस आला. खूप वेळ येत राहिला. तास दोन तास. पण पावसांत जोर नव्हता. आकाश नुसतेंच रडत होतें. अमक्याच्या मृत्यूबद्दल निसर्गानें अश्रु ढाळले— असें वर्णन आतां चावून चर्वट झालें आहे. तें आतां कृत्रिम वाटतें. पंडित नेहरूंसाठीं निसर्गानें अश्रु ढाळले नसतील. पण पाऊस खूप वेळ येत राहिला हें खरें; आणि तो रडका होता हेंहि खरें. पावसाला गर्जत गडगडत धोधो पडायला कोणी कांही मनाई केली नव्हती. ढग तर खूप दाटीवाटीनें जमले होते. तरी पाऊस आला तो नुसताच थुई थुई. पावसाला तसें नेहरूकाकांजवळ जातां आलेंच नसतें. त्यांना चांगलें प्रशस्त दालनांत ठेवलेलें असेल. मग पाऊस नुसताच अंधारांत हिरमुसलेल्या गरीब मुलासारखा मुळमुळत राहिला.

पाऊस आला हें बरें झालें. थांबत नाही हें त्याहून बरें. म्हणजे रात्रीं नेहरूकाकांच्या कोठीवर फारशी गर्दी होणार नाहीं. मग आपल्याला निवांतपणी त्यांच्याकडे खूप खूप वेळ बघतां येईल.

* * *

दहाच्या सुमाराला पाऊस थांबला. आम्ही चार जण पंडितजींच्या कोठीकडे मोटर सायकलीं घेऊन निघालों. रात्रीं फारशी गर्दी होणार नाहीं. कोण रात्रभर जागत बसणार ? आणि पुन्हां पाऊस येणार नाहीं कशावरून ? म्हणून. पण सकाळीं मात्र तोबा गर्दी उडेल. आपण रात्रींच जात आहोंत हें बरें. असा विचार करीत आम्ही तीन मूर्तिजवळ पोचलों. संध्याकाळच्या मानानें गर्दी अगदीच कमी. एक-शतांश सुद्धां नसेल.

वाटेंतच आडव्या तिडव्या उभ्या केलेल्या वाहनांमधून आणि पुढे चाललेल्या लोकांच्या घोळक्यांतून वाट काढीत आम्ही त्या काळ्या दरवाजापाशीं आलों. अजून दरवाजे बंदच. पण बाजूचा लहान दरवाजा उघडा. आणि त्यांत शिरायला लोकांची चौपदरी रांग दर्शन शिस्तींत चाललें होतें. हें बरें होतें. रांगेंत उभे राहायचें म्हणून आम्ही रांगेच्या मागील टोकाकडे जाऊं लागलों. आम्ही चालत राहिलों. बरीच लांब दिसतेय रांग अजून पुढे. आणि आमच्या मागून आलेले घोळके सरळ हल्ला केल्यागत रांगेंत घुसले. दिल्लीच्या लोकांना नाहीं तरी शिस्तच नाहीं. वेळ प्रसंग कळत नाहीं. आजच्या दिवशीं तरी कोणी असें हुल्लडबाजीनें वागूं नये. आपण आपले रांगेंत उभे राहूं या. आम्ही चालत राहिलों. रांगेचा शेवट अजून येईना.

किती लोक रांगेंत उभे होते ! देशी परदेशी. स्त्रिया पुरुष. मुलें म्हातारे. गरीब अफलांतून. कडक इस्त्रीच्या झकपक पोषाखांतले आणि मळक्या गांवठी वेषांतले. तान्हीं मुलें पेंगळून मोठ्यांच्या खांद्यावर झोंपलीं आहेत. आठ दहा वर्षांचीं चिटुकलीं पोरें उत्कंठेनें झोपेला रेटीत ताठ उभीं आहेत. पाय दुखायला लागलेल्या बायाबापड्या रांग सोडून बाजूला विश्रांति घेत बसल्या आहेत. कोणी रांगेंतच जेठा मारला आहे; पुढलीं माणसें पावलें दोन पावलें पुढें सरकलीं कीं बसल्या बसल्याच पुढें सरकायचें.

पण रांग संपतच नाहीं. आम्ही आपले चालत आहोंत. रस्ता संपून रेसकोर्स रोडचा चौक आला. तरी रांगेचें शेपूट लांबच. सुमारे अर्धा मैल चालून गेल्यावर रांगेंतील शेवटला माणूस डोळ्यांना दिसला. त्याच्या जोडीला आम्ही रांगेचें टोक धरलें. पण आमच्या मागून लोक येतच राहिले. रांगेचें शेपूट वाढूं लागलें. पांच पांच मिनिटांच्या अंतरानें लोकांचें घोळके रांग धरायला येत होतें. केवळ दिल्लींतीलच नव्हे; आजुबाजूंच्या गांवांतील लोक रातोरात येऊन थडकत होते.

मुंगीच्या पावलानें आम्ही पुढे सरकूं लागलों. पण ज्या खांबाशीं आम्ही रांग धरली त्या खांबाजवळ रांगेचें टोक कायमच. पुढें सरकत सरकत तो खांब दृष्टिआड होईपर्यंत आम्ही पहात होतों— रांगेचें टोक तिथेंच होतें. त्या खांबाच्या अलिकडे संपूंच नये असाच जणुं त्या रांगेचा संकेत होता.

आम्ही रांग धरली तेव्हां अकरा वाजले असावेत. पण एक वाजायला आला तरी आम्ही त्या अर्ध्या मैलांतील अर्धें अंतरहि कापलें नव्हतें. मग आम्ही आलटून पालटून दरवाजापर्यंत फेरफटका मारून आलों. ताठलेल्या पायांना तेवढाच मोकळेपणा; ताणलेल्या उत्कंठेला तेवढाच विरंगुळा. रांगेंतील जो तो असेंच करीत होता. कोणी परत येऊन रांगेंतील आपल्या माणसांना


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

खुलून सांगावें, 'मी तर बावा दर्शन घेऊन आलों !' कसा ? तर त्यानें फुशारकींत म्हणावें, 'असाच. थेट दारांत गेलों. कोणी अडवलें. नाहीं.' धन्य या महाभागांची. इथेंहि त्यांना प्रदर्शनांत शिरल्यासारखें वाटतें. कोणत्याहि प्रसंगाचा उत्सव बनवायचा हें दिल्लीच्या लोकांना चांगलें साधतें. अजून येथे पाणी–पुरीचीं नि आलू-छोल्यांचीं दुकानें लागलीं. नाहींत हा लोकांनीं आज केवढा संयम दाखवला !

दीड वाजला तेव्हा रांग वेगानें पुढें सरकूं लागली. पुढच्यांची साथ ठेवायला मागच्यांना धावावें लागलें. एकाएकी इतका वेग कसा आला ? मागून येणाऱ्या लोकांनी दरवाजांशीं रांगेंत घुसणें बंद केलें की काय? तेवढ्यांत कोणी तरी येऊन सांगितलें, 'दोन दरवाजे खुले केले आहेत. भराभर लोक जाताहेत.' आम्ही पुढच्यांच्या मागून धावूं लागलों.

पुढच्यांची गति मंदावली. 'चलते रहो', शिपायानें रांगेला बजावलें. एकेक जण पुढे सरकूं लागला. डावीकडच्या मोठ्या दालनांत खादीवाले कोणी कोणी दिसले. तें कोणी काँग्रेसश्रेष्ठी असतील. आणि एकदम नेहरूकाका दिसले. आमच्याकडे तोंड करून शांत पडलेले. डोकें वर आणि पाय आमच्याकडे खालीं असा कलता देह. गुलाबाच्या फुलांनीं आच्छादलेला. अवतीभवती फुलेंच फुलें. त्या डौलदार मंडपीखाली फक्त नेहरूकाका आणि गुलाबाचीं फुलें. चेहरा शांत, नितळ, तेजस्वी, प्रेमळ. त्या चेहऱ्याकडे पाहिलें की कांही तरी अलौकिक देदिप्यमान पाहिल्यासारखें वाटतें. मन मोकळें होऊन त्याच्याकडे धाव घेतें. म्हणून तर आयुष्यभर या माणसांवर साऱ्या देशानें, साऱ्या जगानें, अलोट प्रेम केलें. गेलीं तीस वर्षे हें देशाचें लाडकें जवाहीर होतें. आतां देश निर्धन झाला. गांधीजी गेल्यानंतर हाच माणूस लोकांच्या आशेचा लाल होता. आता लोकांनीं एवढें प्रेम कोणावर करायचें ?

'चलते रहो.' मागच्यांनी पुढें ढकललें, प्रकाशांतून पावलें अंधारांत चालूं लागलीं. आंतल्या पश्चिम दरवाजांतून जातांना भोवती ओकें ओकें वाटलें. भोवती विजेचे दिवे असूनहि उदास काळोख पसरल्यासारखें वाटलें. विस्कटलेल्या मुंग्यासारखे लोक निमूट अस्ताव्यस्त चालत होते. संपलें !

आज मी कांही विशेष पाहिलें होतें. आज माझ्या आयुष्यांत कांही विशेष घडलें होतें. इतकी मोठी घटना माणसाच्या उभ्या आयुष्यांत क्वचितच घडते– पाहिल्याचा अभिमान वाटण्यासारखी; पिढ्यामागून पिढ्यांसाठीं जतन करून ठेवण्यासारखी. पण आज जें पाहिलें त्याचा अभिमान वाटत नव्हता. मन सुन्न होतें. साऱ्या जगाला हादरा देणारा विराट मृत्यु आज मी पाहिला होता. त्या मृत्यूनें निष्प्राण करून टाकलेला नेहरूकाकांचा पार्थिव देह मी पाहिला होता. गति हाच ज्याच्या जीवनाचा स्थायीभाव होता तो देह आज गतिहीन होऊन पडलेला पाहिला होता. या माणसाचें जीवन गतिमान होतें. साऱ्या भारताला त्यानें एक गति दिली. साऱ्या जगाला एक वेगळी गति लावण्यासाठी तो धडपडला. आणि आज त्या गतिमानतेचा जीवच गेला. भोवतीचें सारें वातावरण आज इतकें गजबजलेलें, धावपळीचें असून सुद्धा निश्चेतन असल्यासारखें वाटलें. वारा वेगानें निघून गेल्यावर मागे उगाच भिरभिरत राहणाऱ्या पाचोळ्यासारखें. रात्रीच्या अंधाऱ्या पोकळींत मोटरसायकलवर आपण उगीच असे भिरभिरत जात आहोंत असें वाटलें.

※

महायात्रेची वेळ सकाळीं आठची आधी जाहीर झाली होती. ती बदलून दुपारीं एक वाजताची केल्याचें नंतर जाहीर करण्यांत आलें होतें. दुपारीं एक वाजतां पंडितजींच्या कोठीवरून अंत्ययात्रा सुरू व्हायची होती. सकाळीं तीन मूर्ति गोलावर अंत्यदर्शनासाठीं इतकी अनावर गर्दी झाली की लोकांच्या खुंदाखुंदींत तीन जीव चिरडले गेले.

पंडितजींच्या कोठीपासून राजघाटाजवळ, गांधीजींच्या समाधीपासून सुमारे दोन फर्लांगावर, महायात्रा संपायची होती. तिथेंच सायंकाळीं दहनविधि. महायात्रेच्या या सहा मैल लांब वाटेवर सकाळीं दहा वाजल्यापासूनच लोकांची गर्दी दुतर्फा जमूं लागली. एवढें अवाढव्य दिल्ली शहर ओस पडलें. लोकांच्या झुंडी या मार्गावर गोळा झाल्या.

रात्रीं मी नेहरूकाकांना बघायला नेलें



## पंतप्रधान

### कुसुमाग्रज

इंद्राघरचें पिउनि रसायन प्रधान अमुचे आले
अलकेंतिल चिर यौवन येथें रूप काश्मिरी ल्यालें.
चरण धरेवर शिर मेघावर कसरत कौतुकशाली
नक्षत्रांशीं वरती चर्चा पद ठेचाळत खालीं.
मुलांत काका जगांत स्नेही गुरुजी भारत देशीं
छडी परजती कधी प्रजेवर मग्न कधी उपदेशीं.
उडच्या घालती सभासागरीं-पोलीस खातें तंग-
नाच जंगली जनांत करती मुक्त खेळती रंग.
गर्तांत रमती, देशोदेशीं फिरतें नित्य विमान
निर्यातीच्या गटांत यांचा केवळ पहिला मान.
सूत कातती पुकारती पण अणूयुगाची द्वाही
जनशाही स्थिर करण्यासाठीं वरती नायकशाही
थोडे पंडित थोडे इंग्रज थोडी मोगल शान
कवि मीमांसक समाजवादी गांधींचा अभिमान.
दवा पहाडी–कस्तुरि केशर प्रवंग सोमल कांही
स्फटिकाचा घट-असें विलक्षण मिश्रण झालेंनाही
ताइत कुठला गळचांत आहे कुणास ना हें कळलें
मतें घेउनी त्यांच्या मागे धावति पण मतवाले.
विशाल नयनीं परंतु केव्हां पहा वेदना साचे
शब्दावाचुनि त्यांत उकलतें मानस मानवतेचें.
अतर्क्यतेंतहि एकच निश्चित–आज वादळी रात
गहन तमीं हा एकच जळतो नंदादीप जगांत.







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

नाहीं म्हणून मुलें माझ्यावर रूसलीं होतीं. आपण दुपारीं मिरवणुकीच्या वेळीं जाऊं असें आश्वासन दिल्यावरहि रुसवा कायम होता. सकाळपासून त्यांचीच गडबड चालली होती. माझ्या मागे लौकर निघण्यासाठीं भुणभुण लावली होती. त्यांना घेऊन मी साडे अकराला विजय चौकांत पोचलों. प्रजासत्ताक दिनाची जंगी मिरवणूक दर वर्षी मी विजय चौकांतच पाहतों. केवढी डौलदार मिरवणूक निघते. किती अथांग लोकसमुदाय जमतो ! पण आजची गर्दी कांकणभर जास्तच. एका मागें एक अशीं दहापंधरा माणसें, इतक्या जाडीचा जनसमुदाय सेक्रेटरिएटपासून इंडिया गेटपर्यंत मैलभर पसरलेला. प्रजासत्ताक दिनाच्या दिवशीं येथें मोठी जत्राच भरते. खाण्यापिण्याचीं दुकानें गल्ला भरतात. मौज-मजेची रेंगळ असते. आज मात्र कांहीं नाहीं. दोन पैशांत पेलाभर पाणी देणारा कोणी थंड पाणीवाला सुद्धा नाहीं. प्रजासत्ताक दिनाची मिरवणूक पाहण्यासाठीं पुढचे लोक विशेषत: बायका मुलें, खालीं बसतात आणि मागचे लोक उभे राहतात. पण तेव्हां हिवाळा असतो नि वेळ सकाळची असते. आज कडक उन्हाळ्याची भर दुपार. खाली जमीन इतकी तापलेली की बसावें तर बूड भाजतें, डोक्यावर उन्ह चटकतें. गर्दीत जीव घावरा होतो. तरी माणसें आपल्या जागांना चिकटण्याची धडपड करीत राहिलीं. पुढचीं बसलेलीं-त्यांत वरीच बायकामुलें. मागचीं उभीं— त्यांत बहुतेक पुरुष. कडक कॉलरवाले आणि मळक्या धोतरवाले, सारे एकत्र. उन्हाचा ताप असह्य होउन कोणी जरा हालचाल करावी; बसलेल्यांनी जरा उठावें; या हालचालीनें जरा खळबळ माजावी; उभ्या गर्दीला एक हेलकावा मिळावा आणि गर्दी जरा विस्कटावी. पुन्हा थिर होण्याची धडपड. दोन वाजेपर्यंत माणसें उन्हांत अशीं तिष्ठत राहिलीं.

आणि दोन वाजतां नेहरूकाका आले. एका मोठ्या लष्करी गाडीवर निजलेले ते दुरूनच दिसले. लोकांत एकदम खळबळ माजली. गेल्या दोन प्रजासत्ताक दिनाच्या मिरवणुकींत नेहरूकाका मिरवीत गेले होते. प्रजासत्ताक दिनाच्या मिरवणुकींत मोठा लवाजमा. मैलभर लांब. तिन्ही शस्त्रदळांच्या वैभवासह. हंसत मुखानें लोकांचे नमस्कार घेत व त्यांना नमस्कार करीत. आनंदाच्या जल्लोषांत. पण आज लवाजमा नाहीं. पुढें थोडे सैनिक आहेत; राष्ट्रपति आणि देशाचे पुढारी झाकलेल्या मोटारींत आहेत. आणि नेहरूकाका उघड्या गाडीवर हालचाल न करतां पडले आहेत. त्यांचें मुखमंडळ शांत, तेजस्वी आणि प्रेमळ आहे. त्यावर उन्ह चकाकत आहे. आज ते असे मिरवत जात आहेत. आणि हें शेवटचेंच. दु:खाच्या कल्लोळांत.

खळबळलेल्या जनसमुदायांतून घोषणा उठल्या— 'पंडित नेहरू अमर हो'. पोलिसांची कोंडी फोडून शेकडों लोक मिरवणुकींत शिरले. मिरवणूक पुढें गेली. जनसमुदाय अस्ताव्यस्त पांगूं लागला. दोन्ही मुलांना धरून मी गर्दीतून वाट काढूं लागलों. माझ्या विषण्णपणामुळें मलाच त्यांचा आधार हवा होता. मी माझे हात दोन बाजूला दोघांच्या खांद्यावर टेकले होते.

जरा मोकळ्यावर येतांच मुलगी म्हणाली, 'नेहरूकाकांच्या डोक्यावर कोणी छत्री कां नाहीं धरली ? त्यांना उन्ह नसेल लागत ?' ही नाजुक पोरगी स्वत: दोनअडीच तास उन्हांत तापत बसली होती.

तिच्या प्रश्नाला उत्तर देण्याची मला शुद्ध नव्हती. चालतां चालतां तिच्या खांद्यावर मान टेकून हुंदका आवरीत मी म्हणालों, 'नेहरूकाका दिसायचे नाहींत ग पुन्हां !,'

कोणीच अधिक बोललें नाही. तसेच चालत राहिलों. अवती भवतीचे सारे लोक असेच निमूटपणें चालत होते. उन्हानें कोमेजून मलूल झालेला मुलगा केविलवाण्या स्वरांत म्हणाला 'मला तहान लागली आहे.'

सर्वांनाच तहान लागली होती. आतांपर्यंत सारे लोक, लहान मुलेंबाळें सुद्धा, दोन तीन तास उन्हांत भाजत, नेहरूकाकांच्या दर्शनासाठीं, तहानभूक विसरलीं होतीं. आतां सगळ्यांना तहानेची तीव्र जाणीव झाली. पण कुठेंहि पाण्याचा थेंब नाही. सारीं हॉटेलें, दुकानें बंद. रस्त्यावर एकहि वाहन नाहीं. एका विषण्ण शुकशुकाटांतून सारे लोक गळल्या अंगांनीं पाय ओढीत निमूट चालत राहिले— दीड मैल, कनॉट सर्कलपर्यंत. तिथे कोणी पाणी मिळविलें. कोणी ऑरेंज-कोका-कोला प्याले. कोणी विश्रांति घेत बसले. मग वाहनें मिळतील तसे घरोघर गेले.

तिकडे नेहरूकाकांची मिरवणूक दुतर्फा लोकांचे मुजरे घेत शांतिघाटाकडे जात होती. मनांत आलें, आपण आतां शांतिघाटावर जावें. चितेवर नेहरूकाकांना दंडवत घालावें. पण आतां मनावरोबर देहहि मरगळला होता. घरीं रेडियो लावून बसलों. शांतिघाटावरील अंत्यविधीचें वर्णन चाललें होतें.

कित्येक लोक असे घरींच ऐकत बसले असतील. आमच्या शारदाताईंना पायांचें दुखणें आहे. चालवत नाहीं. वय झाल्यामुळें दगदगहि सोसत नाहीं. त्या घरींच बसून रेडियोवर महायात्रेचें वर्णन ऐकत होत्या. डोळ्यांना धार लागली होती. रडून रडून त्यांचे डोळे लाल झाले होते. चितेला भडाग्नि दिला तेव्हां त्या हुंदके देऊन रडूं लागल्या.

मी रेडियोवर सारें ऐकत होतों. तिथें जमलेला तो जनसंमर्द मला डोळ्यांपुढे दिसत होता. भडाग्नि देतांना वेदमंत्रांचा जप सुरू होता. 'पंडित नेहरू अमर हो' घोषणा निनादत होत्या. चिता पेटत होती. तांबड्या ज्वाळा उंच लवलवत होत्या. नेहरूकाकांच्या देहाला सलगींत झोंबत होत्या. आयुष्यभर या महाभागानें विराट स्वप्नें पाहिलीं. तो महान कवि होता. द्रष्टा होता. कर्मवीर होता. तीं विराट स्वप्नें प्रत्यक्षांत उतरविण्याचा त्याचा भव्य खटाटोप होता. त्याच्या चेतनाहीन देहाला सलगींत झोंबणाऱ्या त्या ज्वाळांना तीं स्वप्नें गवसतील का ? थोडयाच वेळांत त्या ज्वाळांचीहि स्वप्नें विरून जातील. आणि मग उरेल अेक राखेचा ढिगारा— नि:सत्त्व.

महात्मा गांधींचीं स्वप्नें अशींच विरलीं आणि राख उरली. त्यांच्या नांवावर मिरवणाऱ्यांनीं त्या स्वप्नहीन राखेनें देशाला सारवण घातलें. गांधीजींच्या स्वप्नांची धग ज्याच्या हृदयांत कालपर्यंत धगधगत होती त्या नेहरूकाकांचीहि थोड्याच वेळांत राख उरेल. आतां ह्याहि स्वप्नहीन राखेचें देशाला सारवण सुरू होईल कां ?

वर्णन संपून नुसताच घरघरत राहिलेला रेडियो मी मानावर येऊन बंद केला आणि सुन्न पडून राहिलों. ●●●




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




आपल्यालाहि प्रचीति येईल कीं

# टाटा-फिन्ले चहा

*अप्रतिम चहा आहे !*

## ताजा चहा

टाटा-फिन्ले चहा खास पॅकबंद पुड्यांतून व डब्यांतून मिळत असल्यानें तो नेहमींच ताजा असतो.

## स्वादिष्ट चहा

टाटा-फिन्ले चहांत अगदीं निवडक अशीच पत्ती वापरली असल्यानें आपल्यास नेहमीं स्वादिष्ट सुवासयुक्त चहा मिळतो.

## उत्तम चहा

टाटा-फिन्ले चहा काळजीपूर्वक मिश्रित केलेला असतो. त्यामुळें आपल्याला नेहमीं कडक व उत्तम चहा मिळतो.

**टाटा-फिन्ले** *चहा प्या,*
*चहाचा खरा आस्वाद घ्या !*




आपल्या निवडीकरितां पांच उत्तम मिश्रणें
प्रेस्टिज दार्जिलिंग डब्यांतून
ललित सोनेरी पुडा
मिलाप रुपेरी पुडा
बहादूर नारिंगी पुडा
शान निळा पुडा




BI-TFN-5 MAR




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

# मोरू ही पहा आमची मुंबई

—जयवन्त दळवी

**:२:**

*कधीं गुदगुल्या करणारी, कधीं चिमटे काढणारी, तर कधीं मिस्कील-पणें पाठीवर थाप मारणारी अशा बेफाम विनोदी शैलीच्या गेल्या अंकापासून सुरू झालेल्या जयवंत दळवी यांच्या लेखमालेचा पुढील भाग*



मोरू ! आतां आपण जें मुंवई शहर फिरून पहाणार आहों त्याच्या इतिहासाकडे जरा वळून पहाणें इष्ट ठरेल. पाठीमागें जें घडलें तो इतिहास हें जसें खरें, तसेंच इतिहास हा नेहमींच पाठीमागें घडतो हेंहि खरें ! म्हणून इतिहासाकडे पहावयाचें झाल्यास पाठीमागें वळून पहावें लागतें.

थांव मोरू ! इतिहास म्हणतांच अशी जांभई देऊं नकोस. हा इतिहास वर्गांत शिकावयाचा नव्हे. शिवाय मुंवई शहर हें त्यादृष्टीनें सुदैवी शहर आहे. इतिहास म्हटला कीं राजवटी, लढाया, त्यांची सनवारी, विजय (दुसऱ्यांना मिळालेले), पराभव (आपण खाल्लेले), तहांच्या अटी, किल्ल्यांचीं नावें, जिंकलेले भूप्रदेश, त्यांचे नकाशे इतक्या अनेक अनावश्यक गोष्टी आपोआप येतात. आणि मग जांभया देण्याचा प्रसंग गुदरतो. आपल्या पूर्वीच्या राज्यकर्त्यांनीं जांभया दिल्या नसत्या तर कदाचित् इतिहास निराळाच झाला असता.

थांव मोरू ! मुंवईच्या नकाशासाठीं असा चुळवुळूं नकोस. मुंवईचा, विशेषतः जुन्या मुंवईचा नकाशा काढणें फार सोपें आहे. कुठेंहि शाईची दौत उपडी केलीस आणि त्यावर ब्लॉटिंग पेपर ठेवलास तर जुन्या मुंवईचा नकाशा तयार होतो. निदान प्राथमिक शाळेंतल्या क्रमिक पुस्तकांत जुन्या मुंवईचा जो नकाशा छापलेला असतो तो तर या ब्लॉटिंग पेपरसारखाच असतो. असो.

मोरू ! सांप्रत इतक्या वैभवास चढलेलें मुंवई शहर सन १५३० मध्यें मुसलमानां-कडून पोर्तुगीज लोकांच्या हातीं आलें.

पण मामा, हें शहर मुसलमानांच्या हातीं गेलेंच कसें ?

मुसलमानांच्या हातीं गेलेंच कसें ? मोरू, या प्रश्नाचें उत्तर काय वरें देणार ? मुसल-मानांच्याच काय, पण आमची मालमत्ता कधीं कोणाच्या हातीं जाते तें आम्हाला कधींच कळत नाहीं. पराभव हें त्याचें कारण असावें. पराभव ! मोरू, हें एकच खाद्य आम्ही इतिहासांत यथेच्छ खाल्लें. केवळ इतिहासांतच नव्हे, तर चालू काळांतसुद्धां ! पराभवाइतकें आम्ही दुसरें कांहींहि यथेच्छ खाल्लें नाहीं. असो. ज्याच्या नशिवीं जें खाणें आहे तें तो खाणार !

असो. मुसलमानांकडून तें पोर्तुगीज लोकांच्या ताव्यांत आलें असा इतिहासाचा दाखला आहे. त्यासंवंधीं तुला खात्री करून घ्यावयाची असेल तर गिरगांव आणि दादर येथील पोर्तुगीज चर्च पहा. म्हणजे येथें पोर्तुगीजांचें एकेकाळीं वर्चस्व होतें हें तुझ्या ध्यानीं येईल. इतक्या वर्षांनंतरसुद्धां तें वर्चस्व आजहि कांहीं प्रमाणांत चालू आहे. कारण, गिरगांवांत आणि दादरला जाणाऱ्या वसच्या उतारूंना आजहि 'गिरगांव पोर्तुगीज चर्च' किंवा 'दादर पोर्तुगीज चर्च' असें सांगूनच तिकिटें विकत घ्यावीं लागतात. आणि आपल्या वसेस् सुद्धां या दोन चर्चच्या समोर आजहि न चुकतां थांवतात !

पण आमची ही मुंवई जेव्हां पोर्तुगीजांच्या ताव्यांत होती तेव्हां ती रानवट आणि ओसाड गांवासारखी होती. तींत सुमारें चारशें घरें होतीं. आणि लोकांची वस्ती पांच दहा हजारांपर्यन्त होती. त्यांत कोळी, भंडारी आणि पांचकळशी हे लोक प्रामुख्यानें होते. या मुंवईंतील जमिनीच्या वसुलीदाखल पोर्तुगीज सरकारास दरसाल ७०० असुरफ्या म्हणजे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अदमासें ३५० रुपये मिळत. म्हणजे सांप्रतच्या एका गॅझेटेड ऑफिसरचा पैगारच म्हणेनास! येथील जमीन कातळवट आणि वरड होती. आसपास खाजणें असल्यामुळें धान्य वगैरे कांहींच पिकत नसे! (कांहींच पिकत नसे असें म्हटलें म्हणून लोकांचे केंस पिकत नव्हते असें समजूं नकोस !)

तरी सुद्धां या दरिद्री मुंबईवर पुष्कळ वर्षांपासून ईस्ट इंडिया कंपनींतील इंग्रज लोकांचा डोळा होता. अर्थात मुंबईवरचा डोळा आजतागायत सुटलेला नाहीं (किंवा मिटलेला नाहीं म्हण हवा तर!) मुंबईचें भाग्य असें कीं तिच्यावर कोणाचा ना कोणाचा सदैव डोळा असतोच. पण त्या काळांत, आणि मुंबई दरिद्री असतांना तिच्यावर इंग्रजांनीं डोळा ठेवावा यांतून त्या लोकांची दूरदृष्टिच उघडकीस येत नाहीं काय ?

इंग्लंडांतील दरबारचा मुख्य अधिकारी आलिवर क्रामवेल (यालाच सर ऑलिव्हर क्रॉमवेल असेंहि म्हणतात!) यांच्याकडे कंपनीच्या अधिकाऱ्यांनीं सारखें टुमणें लाविलें होतें.—

"हिंदुस्तानांत व्यापार (ह्याचाच पुढें वेपार झाला!) करणेसाठीं आपणास पोर्तुगीज लोकांकडून कसेंहि करून मुंबई बेट मिळेसें करावें." असा त्यांनीं लकडा लाविला होता. त्यांजकडून हें बेट विकत तरी घ्यावें असें त्यांचें म्हणणें होतें. म्हणजे विकणें आणि विकत घेणें हें मुंबईच्या पांचवीस पुजलेलें आहे हें, मोरू, येथें तुझ्या ध्यानीं आलें असेल !

परंतु थोड्याच काळांत अगदीं अनायसें हें बेट इंग्रजांस मिळालें. तूं म्हणशील कसें मिळालें. तर ऐक– सन १६६१ मध्यें पोर्तुगालच्या राजानें आपली कन्या इंग्लंड देशाचा राजा दुसरा चार्लस यास दिली. म्हणजे तिचें त्याच्याशीं लग्न केलें. लग्नसमयीं पोर्तुगालच्या राजानें हें बेट जांवयाला आंदण दिलें. (यालाच हपापाचा माल गपापा असें म्हणतात!) पण तरी सुद्धां मोरू, तूं गंमत पहा. ज्यावेळीं हें बेट पोर्तुगीजांनीं आंदण दिलें त्यावेळीं या बेटाची जमाबंदी अवघी साडेतीनशें रुपयांची होती. एवढ्या उत्पन्नांत सध्यां दोन क्लास फोर पट्टेवाले सुद्धां नेमतां येणार नाहींत. त्यावेळीं सुद्धां त्या उत्पन्नांतून या बेटाचा खर्च भागणें मुष्कील पडे.

मामा, म्हणजे आयजीच्या जिवावर बायजी उदार! मोरू, त्यालाच ना आपण इतिहास म्हणतो. इतिहास फक्त आयजी आणि बायजी हे दोघेच घडवतात. बाकीचे फक्त जी जी करतात. पण गंमत पहा. एवढा दरिद्री भूप्रदेश आपल्या जांवयास आंदण देणारा पोर्तुगीज राजा किती वरें लबाड असला पाहिजे? तसेंच हें दरिद्री बेट भेट म्हणून दिलें म्हणून रुसून न बसतां बेट आणि बेटी दोन्हीं लाटणारा इंग्रज बादशहा केवढा धूर्त असला पाहिजे! मोरू हाच इतिहास वरें? इतिहास शिकणें म्हणजे कोण लबाड होता आणि कोण धूर्त होता हें पहाणें होय? यांपैकीं एकहि गोष्ट आम्हाला कवींच जमलेली नसल्यामुळें आपण ती तटस्थपणें पाहूं शकतो.

मामा, पोर्तुगीजांनीं येथें येवून मुंबईवर ताबा ठेवावा किंवा नंतर ते शहर इंग्रजांच्या ताब्यांत जावें यांत आपली नामुष्कीच नाहीं का ?

मोरू? याला नामुष्की तरी कशी म्हणावी? अखेर हा सारा इतिहास आहे. त्यांत कोणाचा दोष नाहीं. आपल्या पूर्वजांनीं पराक्रमाची शर्थ केली. पण गनिमांनीं अधिक शर्थ केली त्याला आपले पूर्वज तरी काय करणार? आपल्या दृष्टीनें तूं इतिहासाचा बारकाईनें अभ्यास केलास तर तुला हें दिसून येईल कीं इतिहासांतल्या 'इतक्यांत–' या एकाच शब्दानें आमची धूळधाण केली आहे. जेथें जेथें आम्हीं संग्राम केला त्याचीं तूं वर्णनें वाच. 'मग तलवारीला तलवार भिडली. मराठे तटाला भिडले. आपल्या फौजांनीं मर्दुमकीची शर्थ केली. मग रणधुमाळी माजली. गनिम हटूं लागला..' असें वर्णन येतां येतांच 'इतक्यांत-' हा शब्द येतो. आणि मग होऊं नये तें होतें. म्हणजे घोटाळाच होतो. 'इतक्यांत–' आमच्या सेनापतीचें मुंडकें

**प्रश्न सुटला !**

द. अ. वंडंमंत्री

"अग, आजच्या माझ्या व्याख्यानामुळें ४ वर्षं पादत्राणांचा खर्च वांचेल !"



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

उडतें, किंवा त्याची पालखी खालीं पडते. (एवढ्या लढाईच्या धुमश्चक्रींत आपल्या लोकांनीं तरी पालखींतून कां वरें जावें?) सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं 'इतक्यांत' या एका शब्दामुळें आमच्या हातचें सारें गेलें. मग मुंबई गेली तर नवल कसलें.

मोरू! तथापि आम्ही अगदींच हे नाहीं. वाट पाहून पाहून कां होईना, पण शेवटीं आम्हीं इंग्रजांना हाकलून दिलेंच कीं नाहीं? आतां तर त्यांची आठवण सुध्दां नको म्हणून त्यांचे जुने पुतळे आणि त्यांची इंग्रजी भाषा यांचीहि हाकालपट्टी करण्याची आम्हीं जय्यत तयारी केली आहे. पोर्तुगीजांना सुव्दां आम्ही गोव्यांतून हांकलून दिलें. इतकेंच काय पण ठाणें आणि वसई येथें पोर्तुगीज आमच्याशीं पूर्वीं लढले त्याचा कडकडीत निषेध म्हणून त्या दोन्ही ठिकाणीं आजहि आमच्या लोकल गाड्या ठरल्या वेळे-पेक्षां उशिरा जातात. सविनय निषेधाचा एवढा उत्तम मार्ग अन्यत्र कोठें शोधून तरी सांपडेल काय? ही मर्दुमकी आम्हाला भूषणावह नाहीं काय? कारण अखेर आमची मर्दुमकी ही प्रामुख्यानें निषेध व्यक्त करण्यामध्यें असते हें दृष्टिआड करून चालणार नाहीं.

मामा, पण या वेटास मुंबई हें नांव कसें पडलें?

वा:? मोरू, तूं तर अगदी नामी प्रश्न विचारलास. मुंबईच्या वंदरासारखें व्यापारास आणि जहाजांस सोयीस्कर असें दुसरें वंदर भरतखंडांत शोधून सांपडणार नाहीं. पोर्तुगीज भाषेंत 'वों' म्हणजे चांगलें, आणि 'वेहिया' म्हणजे वंदर असा अर्थ होतो. 'वोंवेहिया' म्हणजे चांगलें वंदर! 'वोंवेहिया'-'वॉंवे' मुंवई असें या शहराचें नामाभिधान झालें. असें तज्ज्ञ लोकांचें म्हणणें आहे. 'वोंव' आणि 'वोंवा-वोंव' हे शब्द आणि त्यामागल्या कृति ज्या प्रकारें 'वॉंवेंत' मूळ धरून राहिल्या आहेत त्या पहातां तज्ज्ञांचा हा कयास खरा असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं.




वरें! तर मोरू, आतां तो ब्लॉटिंग पेपर उचल वघूं. त्यावर ते वेडेवाकडे सात काळे डाग दिसत आहेत ना? तींच मुंवईचीं सात वेटें. कुलावा, धाकटा कुलावा, मुंवई, माजगांव, परळ, वरळी आणि माहीम. हीं जुनीं सात वेटें होत. चारी वाजूस पाणी व मध्यें जमीन असली कीं त्याला वेट म्हणतात. या सर्व वेटांच्या भोंवतीं पूर्वीं समुद्र होता असें म्हणतात. म्हणूनच (मासे पकडणाऱ्या) कोळ्यांची वस्ती वेटांच्या किनाऱ्यावर होती. अजूनहि त्यांचे कोळीवाडे ठिकठिकाणीं आहेत. शिवाय मासळीवाजारहि त्यांचेच आहेत. आपण येथले मूळचे लोक हें (हें आम्ही मान्य केलें तरी) सिद्ध करण्यासाठीं ते अद्याप 'त्या' मूळ अवस्थेंत फिरतात. कमरेला एक त्रिकोणी फडकें गुंडाळून वावरतात. तरी त्यांतल्या त्यांत कोळी परवडला, पण ती कोळीण नको. मुंबईवरील आपल्या मूलभूत हक्काची तिला फार घमेंड असते. ती कधीं कुणाला ताडकन् तोडून वोलेल याचा पत्ता नसतो. असो!

सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं जुन्या मुंवईचीं सात वेटें होतीं. वेट म्हटलें कीं त्याच्या भोंवतीं पाणी असलेंच पाहिजे. तथापि आतां आम्ही हवा खाण्याचें निमित्त करून समुद्र-किनाऱ्यावर फिरायला जातों तेव्हां फक्त एका बाजूसच आपणास समुद्र दिसतो. बाकी तिन्ही बाजूस जमीन दिसते. खरे म्हणजे आजकाल उघडी जमीन सुद्धां फारशी दिसत नाहीं. घरें आणि माणसेंच अधिक दिसतात. यामुळें या मुंबईचीं जुनीं सात वेटें होतीं आणि भोंवतालीं पाणी होतें यावर आतां तुझा विश्वास बसणार नाहीं. परंतु पूर्वीं येथें वेटें होतीं याला लेखी पुरावा आहे. तो सुद्धां एका इंग्रजानें लिहून ठेवलेला. परक्यांचे दाखले आम्हाला तावडतोव पटतात.

इसवी सन १६७२ मध्यें डाक्तर फ्रायर हे देशपर्यटण करावयास युरोपांतून भारतांत आले होते. त्यांनीं आपल्या प्रवासवर्णनांत मुंवईचें वर्णन केलें आहे. (यावरून प्रवासवर्णनासाठीं देशपर्यटण करण्याची प्रथा मराठी लेखकांनीं सुरू केलेली नसून पूर्वापार आहे हें आपोआपच सिद्ध होतें) तर हे डाक्तर फ्रायर मुंवईबद्दल लिहितात –"ह्या वेटाचा वहुतेक भाग म्हणजे सुमारें ४० हजार विघे जमीन समुद्राच्या पाण्यानें भरून वाहत असते. आणि सरासरी दहा हजार विघे जमिनीचा भाग मात्र वास्तविक जमिनींत गणला जातो. मुंवईचीं लहान लहान पांच वेटें आहेत. आणि त्यांतून खाऱ्या पाण्याच्या खाड्या असून त्या चिखलानें भरलेल्या आहेत. ओहोटीच्या वेळीं हीं वेटें पांच दिसतात, परंतु भरती आली म्हणजे जिकडे तिकडे पाणी भरून सात होतात."

मोरू! हे डाक्तर साहेब मुंवईच्या जमिनीचा हिशेव विघ्यांमध्यें देतात. पण विघ्यांचें कोष्टक आम्हाला कळत नाहीं. कांहीं वर्षांपूर्वीं येथील उपलब्ध जमिनीचा हिशेव चौरस वारांत होई. सांप्रत तो चौरस फुटावर आला असून आणखी पांच सात वर्षांच्या अवधींत जमिनीची खरेदी विक्री चौरस इंचांत होईल यांत संदेह नाहीं. म्हणजे मोरू, काळाप्रमाणें मापें सुद्धां वदलतात.

मामा, खाऱ्या पाण्याच्या खाड्या जर चिखलानें भरलेल्या होत्या तर तो चिखल गेला कुठें?

आमच्या पूर्वजांनीं तो फेकला असला पाहिजे. त्याशिवाय चिखलफेकीची कला आमच्या अंगीं अशी उपजत आली नसती.

मामा, डाक्तर साहेव म्हणतात कीं, ओहोटीच्या वेळीं हीं वेटें पांच दिसत आणि भरतीच्या वेळीं पाणी भरून सात होत. हें कसें? वास्तविक ओहोटीच्या वेळीं सात आणि भरतीच्या वेळीं, दोन वेटें वुडून, पांच दिसायला हवींत.

मोरू! ही साधी गोष्ट आहे! हा सोयीचा प्रश्न नव्हे काय? भरतीच्या वेळीं दोन वेटें वुडलीं तर प्रत्येक भरतीच्या वेळीं तेथील लोकांना इतर पांच वेटांवर पळावें

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

लागलें असतें. आणि त्यावेळच्या दारिद्र्यांत दरदिवशीं पूरग्रस्त निधि कसा वरें उभारतां आला असता? असो.

त्यावेळीं आपली मुंबई ही अत्यंत दरिद्री होती. ती किती गरीब होती याचा कागदोपत्रीं पुरावा आहे. १६९९ सालीं मुंबईचे गव्हर्नर सर जान गेयर यांनीं सुरतेच्या वखार–प्रमुखास पत्र लिहिलें होतें. त्यांत ते लिहितात–"एथील लोक पादचारी आहेत. वसण्याजोगा मुंबईंत एकच घोडा असून गाडीस जुंपण्याजोगी बैलांची एकच जोडी आहे." म्हणजे यावरून मुंबई किती दरिद्री होती हें निदर्शनास येतें. त्यावेळीं गव्हर्नर व कौन्सलर लोक देखील मुंबईत बैलांच्या गाड्यांतून फिरत असत. कदाचित् हा तात्कालीन स्थानिक लोकांचा डावहि असेल. या इंग्रजांना बैलगाडींतून फिरायला भाग पाडून त्यांचीं हाडें खिळखिळीं करावींत असाहि बंडखोर विचार त्यावेळच्या मुंबईकरांनीं केला असावा!

मोरू! आतां आपण मुंबईची माहिती मिळविण्यापूर्वी तिच्यांतील मुख्य भागांना कोणतीं नांवें आहेत व तीं त्या भागांना कां पडलीं हें पहाणें मोठें मौजेचें आहे. हें वाक्य तुला प्राथमिक शाळेंतल्या क्रमिक पुस्तकांतलें वाटेल! तसें तुला वाटलें तर तें योग्यच आहे! कारण मीं तें त्याच पुस्तकांतून घेतलें आहे.

कुलावा हें मुंबईच्या दक्षिणेस शेवटचें लहानसें ओसाड बेट होतें. पूर्वी त्या भागांत मुख्यतः कोळी लोक रहात. त्यांच्या रहाण्याच्या वाड्यांना कोळभाट म्हणत. त्या नांवावरूनच कोलावा किंवा कुलावा हें नांव रूढ झालें. इतिहासकारांचें हें अनुमान खरें असावें. कारण आजहि त्या भागांत कोळी लोकांची वस्ती असून त्या भागांत शिरतांच मासळीचा वास येतो. पूर्वी हें ढोरें चरण्याचें ठिकाण होतें. येथें कोळी लोक भाजीपाला उत्पन्न करीत, व मासळी विकून निर्वाह चालवीत. तेथें जाण्यास लहानशी तर लागत असे. या कुलाव्याबद्दल सरकारला सालीना १३० रुपये खंडणी मिळे. कंपनी सरकारनें ही खाडी १८३८ मध्यें पूल बांधून व भर घालून मुंबईस मिळविली. पूर्वी इंग्रज लोक येथें हरणें आणून सोडत व शिकारीस जात. ही ऐतिहासिक माहिती खरी असावी. कारण आजहि या भागांत हरणें फिरतांना दिसतात. आणि कांहीं शिकारी लोक काळोख पडतांच चोरट्या नजरेनें शिकार शोधत असतात

इसवी सन १७७१ मध्यें सरकारनें मोठ्या कुलाब्यास दांडी बांधिली. दूरचीं जहाजें मुंबईहून दिसावीं आणि दूरच्या जहाजांना मुंबई दिसावी म्हणून ही दांडी बांधण्यांत आली. जिच्यावर दांडी बांधिली ती डोंगरी समुद्र सपाटीपासून सत्तर फूट उंच होती. आणि खुद्द दांडीची उंची ८० फूट होती. मिळून या दांडीची उंची १५० फूट होती. त्यांत कंदील लावले म्हणजे ते उजडेपर्यंत फिरत असत. यांत दर दिवशीं दीड मण तेल जळत असें. सध्यां मुंबईत नवलाख दिव्यांचा इतका उजेड पडतो कीं त्या मानानें या दांडीचा कांहीं तसा उपयोग नसावा. तथापि ती अस्तित्वांत आहे. कारण काळोख पडला कीं ती नेमानें पेटते.

त्याच सुमारास मुंबईच्या सुरक्षेसाठीं इंग्रजांनीं फोर्ट म्हणजे कोट बांधिला. म्हणून त्या भागास फोर्ट किंवा कोट असें म्हणतात. या कोटाला तीन दरवाजे होते. एक पूर्वेस होता म्हणून त्याला अपोलो गेट म्हणत. तेंच आतांचें अपोलो बंदर!

बांधकाम योजना जलद साकार होण्यासाठीं...

टोलेजंग इमारती, मोठ मोठे रस्ते,
कारखाने, धरणें, पूल व रेल्वे मार्ग, ...
जिकडे तिकडे बांधकामांची एकच प्रचंड धमाल
उडाली आहे. जागृत भारत प्रगतिपथावर
झपाट्यानें कूच करीत आहे ...

...आणि या कामांत **स्वस्तिक इंडस्ट्रियल**
**गम–बूटस् व रबरी हातमोजे** कामगारांच्या हातांपायांचें
इजा–अपघातांपासून उत्तम संरक्षण करून,
बांधकामें, अधिक प्रचंड, अधिक चांगलीं आणि
अधिक जलद व वेळींच पुरी होण्यास
हातभार लावीत आहेत.

**स्वस्तिक**
**रबर प्रॉडक्टस् लि.**
खडकी पुणे-३

इंडस्ट्रियल
गम-बूटस् व हातमोजे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कोटांतील चर्चकडे येण्याचा दरवाजा तें चर्चगेट. कोटाच्या उत्तर भागांत बोहरी बाजार होता. त्यांत येण्याच्या दरवाजास बझारगेट असें म्हणत. बोहरी बाजाराजवळचें बंदर तें बोरी बंदर. या बंदरांत पूर्वी फक्त होडींतून उतरण्यापुरती थोडीशी सोय होती. आसपास खडक असल्यामुळें उतारूं लोकांस एका खडकावरून दुसऱ्या खडकावर उड्या मारून वर यावें लागे. अर्थात जिकडे तिकडे सगळी अडचणच होती. माल उतरून घेण्याची किंवा गाडी येण्याजाण्याची मुळींच सोय नव्हती. बाजूस लहानशी टेकडी होती. व आसपास मोठमोठाले खडक होते. त्यामुळें दहा पंधरा मनुष्यांस एकदम उतरायाचें पडलें तर मोठीच अडचण पडे.

मोरू ! कागदोपत्रींचा हा दाखला पाहून कोणालाहि आश्चर्य वाटेल ? त्या काळीं या बोरी बंदरांत दहा-पंधरा उतारूंस उतरण्याची जेथें अडचण पडे तेथें आतां दर दोन तीन मिनिटांस आगगाडींतून दहा-पंधरा हजार उतारू पटापट उतरतात हें नवल नव्हे काय ? पूर्वी लोक खडकावर उड्या मारून वर येत. आतां मात्र तें उड्या मारण्याचें सुख नाहीं. गाडीबाहेर पाय ठेवतांच आतां तो निश्चित जमिनीवर पडेल कीं कोणाच्या पायावर, धोतरावर अथवा साडीवर पडेल याचा कांहीं नेम नसतो. त्यामुळें उडी मारणें दूरच राहिलें. तसें पाहिलें तर, मोरू! उडी मारणें हा प्रकारच आतां मुंबईतून कायमचा नष्ट झाला आहे. खोलींतल्या तारेवर वाळत टाकलेला टॉवेल काढण्यासाठीं दिवसांतून एकदां उडी मारावी लागते तेवढीच. अन्यथा उडी मारणें हा प्रकार मुंबईंत आतां दिसतच नाहीं. किंबहुना आपण अहिंसा व्रत पत्करल्यापासून 'मारणें' हा शब्दच अर्थहीन झाला आहे. उडी मारणें, छडी मारणें, गप्पा मारणें, इतकेंच काय, पण थापा मारणें हे प्रकार सुध्दां हळूहळू कमी होत आहेत. (नांवाजलेले थापाडे सुध्दां आपण थापा मारत नाहीं असें म्हणूं लागले तेथें आणखी काय सांगायचें ? ) तथापि मुंबईंतल्या कांहीं लोकांनीं 'डोळा-मारणें' आणि 'धक्का मारणें 'हे प्रकार सुरू ठेवून आपल्यांतली क्षत्रिय वृत्ति टिकवून ठेवली आहे. ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय ! असो.

मोरू ! कोटाच्या उत्तरेस एक तलाव होता. तेथें धोबी लोक कपडे धूत असत, म्हणून या भागास धोबी तलाव असें नांव पडलें. त्याच्या शेजारीं अपराधी लोकांस दंड करण्यासाठीं जागा नेमली होती. ही जागा बझारगेटाच्या समोर असल्यामुळें येथें लोकांची रहदारी फार असे. पूर्वीच्या लोकांचा असा नियम होता कीं अपराध्यास शासन करायचें तें गजबजलेल्या ठिकाणीं करावें. म्हणजे तें सर्व लोकांच्या दृष्टीस पडून द्वाड लोकांस दहशत बसते. एकाद्याच्या अपराधाप्रमाणें जसें शासन ठरविलें असेल तें येथें केलें जाई. कोणास कवटें व शेण मारीत. कोणास पिंजऱ्यांत घालून फिरवित. कोणास खांबास बांधून फटके मारीत. कोणाची गाढवावर बसून धिंड काढवीत. धिंड काढायची असल्यास प्रथम त्या मनुष्यास येथें शृंगारून तयार करीत. आणि मग रस्तोरस्ती फिरवीत. शृंगारण्याचा प्रकार असा होता—त्याची अर्धी हजामत करवीत. कपाळावर शेंदूर घालीत. त्याचें तोंड रंगवीत. गळ्यांत कांद्याच्या माळा घालत. अंगांत चित्रविचित्र पोषाख घालून त्याचें सोंग बनवित. आणि गाढवाच्या शेपटीकडे त्याचें तोंड फिरवून त्यास त्यावर बसवीत. मग शिंग फुंकीत आणि दुसरीं वाद्यें वाजवींत त्याची रस्तोरस्ती वरात काढीत. पांचपन्नास पोरें हुर्यो हुर्यो असा आरोळ्या ठोकीत त्याच्या मागून फिरत आणि त्यावर शेण अथवा धूळ उडवीत. या तलावाच्या एका बाजूस खुनाच्या अपराध्यास फांशी देण्याची जागा होती. त्याच्या दुसऱ्या बाजूस शेणमार करावयाचें यंत्र होतें. त्याच्या जवळच एक पिंजरा होता. त्यांत अपराध्यास घालून तो घेरी येऊन पडेपर्यंत पिंजरा तास, अर्धातास फिरवीत असत.

पण मोरू ? ही शिक्षा फार महाग पडूं लागली. एका गुन्हेगारास सजा 'द्यायची म्हणजे अनेक गोष्टींची जमवाजमव करावी लागे. 'अर्धी हजामत करायला न्हावी हवा. चित्रविचित्र पोषाख करायला मेकपवाला हवा. कांद्याच्या माळा 'हव्यात. 'गाढव हवें. शेण हवें, आणि हुर्यो करायला पोरें हवींत. एवढ्या गोष्टींसाठीं बेसुमार खर्च हा येणार. सरकारला हा खर्च झेपेनासा झाला आणि म्हणून हीं प्रथा बंद पडली. कालान्तरानें तलावहि बुजला. धोबी लोक दुसरीकडे गेले. धोबी तलाव हे नांव बाकीं राहिलें. आज तेथें नांव घेण्यासारखी चीज म्हणजे मेट्रो सिनेमा. येथें इंग्रजी सिनेमा लागतात. दर दोन मिनिटाला एक या हिशोबानें चुंबनें पहाण्याची इच्छा झाली कीं आम्हीं अनेक मुंबईकर इंग्रजी समजलें नाहीं तरी पदरमोड करून या सिनेमाला जातों. पण हें थिएटर एअर कंडिशण्ड असल्यामुळें तें आंतून थंड असतें. त्यामुळें प्रेक्षकहि बाहेरून फार गरम होऊं शकत नाहीत. असो.

मोरू ! मुंबई बेटाच्या पश्चिमेस जो डोंगर दिसतो त्याच्या दक्षिण बाजूस एक देऊळ आहे. त्यांतील देवास वाळुकेश्वर म्हणतात. असें सांगतात कीं वनवासाच्या वेळीं राम सीतेचा शोध करीत येथें आला. तेव्हां तेथील ब्राह्मणांनीं रामाला सांगितलें कीं, तूं शंकराची पिंडी तयार करून तिची पूजा कर. म्हणजे तुझी बायको तुला परत मिळेल. मग रामानें वाळूची पिंडी तयार केली. पण पूजेला पाणी मिळेना. तेव्हां लक्ष्मणानें बाण मारून गंगा उत्पन्न केली, आणि पूजेसाठीं पाणी आणून दिलें. म्हणून त्या भागाला बाणगंगा असें नांव पडलें.

यावरून कांहीं गोष्टींचा आपणांस बोध होतो. मुंबईच्या भूमिचाच गुण असा आहे कीं येथें नाहीं म्हटलें तरी बायका गायब होतात. मोरू ! जेथें रामाला सुध्दां सीतेचा शोध करीत मुंबईंत यावें लागलें तिथें इतर पामरांची काय कथा ? आपापल्या हरवलेल्या बायका शोधत येथें फिरणाऱ्या आजच्या दुर्दैवी पुरुषास हंसण्यांत काय बरें अर्थ ? सीता जशी सोनेरी हरणाच्या मागें लागून फसली तशाच येथील अनेक बायकाहि सोनेरी हरणांमागें लागूनच फसतात. फरक इतकाच कीं सीतेनें हरीण धरण्याचें काम रामावर सोपवलें, तर आजच्या सीता हरणाच्या मागें आपणहूनच लागतात. अनेकदां त्यांच्या रामांना त्याचा पत्ताहि नसतो.

तसेंच, ज्या मुंबईंत खुद्द प्रभु रामचंद्राला








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पिंडीच्या पूजेसाठीं पळीभर पाणी मिळालें नाहीं तेथें आज प्यायलीं लोटाभर पाणी मिळत नाहीं म्हणून ओरड करण्यांत काय वरें अर्थ ? चालू काळांत वाण मारून वाण-गंगा आणणारा लक्ष्मण कुठें सांपडणार ? तसला लक्ष्मण, आणि तसला वाण आतां दिसणें नाहीं.

मोरू ? सांप्रत जिला आम्ही पायधुणी म्हणतो तेथून सलग खाऱ्या पाण्याची खाडी होती. भरती आली म्हणजे भेंडीवाजारा-पासून चिंचवंदरापर्यन्त पाणी भरून जाई. मग माहीम, वरळी, माटुंगा येथून कामावरून येणारे लोक या खाडींत पाय धुवून मुंबईस येत. त्यामुळें या भागास पायधुणी असें नांव पडलें. पूर्वी येथें लोक पाय धूत एवढें तरी सांगण्यासारखें होतें, आतां तेवढें सुध्दां सांगण्यासारखें नाहीं. नाहीं म्हणायला येथील पोलीस स्टेशन नांवारूपाला आलेलें आहे. कारण 'पायधुणीचे पोलीस तपास करीत आहेत' असें अनेकदां वर्तमानपत्रांत छापून येतें.

सध्यां परळ भाग हा कामगार वस्तीचा समजला जातो. या भागांत गिरण्या खूप आहेत. त्यामुळें साहजिकच येथें कामगार रहातात. येथेंच एक छोटेसें मैदान आहे. त्याला कामगार मैदान म्हणतात. येथें कामगार-पुढाऱ्यांची नित्य आरडाओरड चालू असते. पण फार पूर्वी या भागांत श्रीमंत लोक रहात असत. सावकार व धनवन्त लोकांचे येथें बंगले होते. वाहेरचे श्रीमंत लोक येथें हवेसाठीं येऊन रहात असत. येथील हवा आणि पाणी फार चांगलें होतें. येथील पोयवावडी तर चांगल्या पाण्यासाठीं प्रख्यात होती. आतां ती नष्ट झाली असून वसचें तिकीट मागण्यापुरतें पोयवावडीचें नांव घेतलें जातें.

मोरू ! अशा कितीतरी ठिकाणांबद्दल अनेक गोष्टी सांगतां येतील. पण जातां जातां आपल्या सोनापुरचा उल्लेख मात्र अवश्य केला पाहिजे. सोनापूर ही मुंबईची स्मशानभूमि. मुंबईंत तशा अनेक स्मशान-भूमि आहेत. पण सोनापूरला जें महत्त्व आहे तें इतरांना नाहीं. मेल्याशिवाय आयुष्याचें सोनें होत नाहीं या मूलभूत विचारांतूनच या भूमीला सोनापूर हें नांव लाभलें असावें. येथें दहनासाठीं प्रेतें सुद्धां अनेकदां रांगा वरून पडलेलीं असतात. आणि त्यांचा नंवर लागेपर्यंत, वरोवर आलेलीं माणसें छपराखालीं वाकांवर वसून देण्याघेण्याच्या गोष्टी स्वस्थपणें करीत असतात. तथापि एकदां नंवर लागला कीं पुढल्या विधीस वेळ लागत नाहीं. येथें लाकडांची सोय चांगली आहे. तसेंच, समुद्रकांठचा वारा वाहात असल्यामुळें अग्नि एकदम भडकतो आणि मृतांच्या आप्तेष्टांस फारसें खोळंवून राहावें लागत नाहीं.

या भूमीच्या जवळच विजेच्या साहाय्यानें प्रेतें जाळण्याची नवीन सोय आपल्या कृपाळू नगरपालिकेनें केली आहे. या सोयीमुळें लांकडें वांचतात. सर्वत्र वचतीची मोहीम चालू असतांना, आपण मरतां मरतां चार लाकडें वांचविलीं असें मृतात्म्यास वाटावें आणि त्याला सद्गति लाभावी हाच नगर-पालिकेचा यांत हेतु आहे. शिवाय, विजेचा प्रवाह हा गतिमान असल्यामुळें सद्गतीसुद्धां लवकर मिळत असावी.

याच स्मशानभूमीला लागून पूर्वी इंग्रज लोकांची स्मशानभूमि होती. अगदीं काल-परवांपर्यंत होती. येथें अनेक जातींचीं थडगीं होतीं. 'मुंबईचें वर्णन' या जुन्या ग्रंथांत या स्मशानभूमीवद्दल लेखकानें लिहिलें आहे— "कोठें त्रिकोणी कोठें चौकोनी अशा अनेक तऱ्हेच्या कवरी वांधिल्या आहेत. त्यावर मृत पुरुषांचीं नांवें लिहून त्यांच्या वर्तणुकीचा उल्लेख केला आहे. हेंहि स्थळ पहाण्याजोगें आहे. येथें आजपर्यंत कोण कोण इंग्रज देवाज्ञा पावले व त्यांचें आचरण कसें होतें हें सर्व समजतें. हें स्थळ पाहून मनुष्यास आत्मवोध होऊन आपण ह्या जगांत केवळ प्रवासी आहों आणि आजपर्यन्त जे मोठे मोठे होऊन गेले त्याच मार्गानें आपणांसहि जावयाचें आहे असें क्षणभर तरी मनांत येतें. हें केवळ स्मशानवैराग्य आहे खरें, परन्तु जे लोक नेहमीं ख्यालीखुशालींत निमग्न असतात, त्यांनीं तर अशा ठिकाणीं जाऊन थडग्यावरील लेख वाचून पहावें. आणि त्यांचें मनन करावें.

सदर लेखकानें शंभर वर्षांपूर्वी हा सल्ला दिला. पण मुंबईकरांनीं तो मानला नाहीं. इंग्रज मृतांच्या कवरीवरील चांगल्या वर्तणुकीचे उल्लेख वाचण्यांत मुंबईकरांनीं वेळ खर्च केला नाहीं. कारण मेल्या म्हशीला मणभर दूध हा न्याय त्यांना तोंडपाठ होता. त्यामुळें येथील लोकांनीं या कवरीचा उलटा उपयोग करून घेतला. आपण या जगांत केवळ प्रवासी आहोंत असें समजून प्रवासापुरते एकत्र आलेले तरुण-तरुणी या थडग्यांमागें लपून आपला एकांत साजरा करूं लागले. रात्रीं अपरात्रीं थडग्यामागें प्रेम-प्रकरणें करणाऱ्या युगुलांवर भुरटे लोक झडप घालून त्यांना लुवाडूं लागले. कामगार छोटया छोटया सभा घेऊन थडग्यांचा खुर्च्या-टेवलांसारखा उपयोग करूं लागले. थोडक्यांत म्हणजे आत्मवोधाकडे कुणी लक्षच दिलें नाहीं. म्हणून आपल्या नगरपालिकेनें तीं थडगीं काढून त्याऐवजीं मोठा वगीचा उभारण्याचें काम सुरू केलें आहे. येथें उद्यां वगीचे फुलतील, पण थडग्यामागें एकान्तांत जें प्रेम फुलत होतें तें आतां कधीं येथें फुलेल का? असो!

मामा, म्हणतां म्हणतां बऱ्याच ऐतिहासिक ठिकाणांची तुम्ही माहिती सांगितली.

होय मोरू! पण मुंबईचीं ऐतिहासिक ठिकाणें हीं केवळ ऐतिहासिक म्हणायचीं. त्यांतलीं वरीचशीं इतिहासजमा आहेत म्हणून ऐतिहासिक म्हणायचीं. पण जेथें इतिहास घडला अशीं ठिकाणें मुंवईत नाहींत. कारण इतिहास घडवण्याची मुंबईकरांना ईर्षाच नसते. आणि त्यांतहि कांहीं चूक आहे असें नव्हे! तसें पाहिलें तर इतिहास तरी घडवण्यांत काय अर्थ आहे? फुकट इतिहासाचीं पानें वाढवून पोरांचा पाठांतराचा त्रास वाढेल! इतिहासापासून तसें शिकण्यासारखें कांहीं नसतें, निदान आम्ही तरी कांहीं शिकत नाहीं. तेव्हां अशा इतिहासांत आपण फार शिरूं नये हे वरें!

मोरू! एकूण मुंबई कशी होती याची तुला कल्पना आली असेल! ●●●

**जास्तीत जास्त बचत करा**
**रकमा काढण्याची नको त्वरा**


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



सुप्रसिद्ध हिंदी कथालेखक
सआदत हसन मंटो
यांची भावस्पर्शी दीर्घकथा.
—अनु. वामन प्रभु

# काळढोळ

**दिवसभराच्या** थकव्या-नंतर नुकतीच ती खाटेवर टेकली होती आणि टेकतांच झोपीं गेली होती. म्युनिसिपालटीच्या संफाई वोर्डाचा जमादार—तिचा शेठ—नुकताच तिच्या शरीराची ओढाताण करून दारूच्या नशेंत, घरीं परतला होता... तसा तर तो रात्रींचा तेथेंच थांबायचा पण त्याला आपल्या धर्मपत्नीची भारीच काळजी ! तो नुकताच घरीं परतला होता. शरीर विकून त्या जमादारापासनं वसूल केलेले रुपये तिच्या अंगाली तंग वसलेल्या चोळींतून बाहेर डोकावत होते. तिचा श्वास सारखा खालींवर होत होता. त्यामुळं आंतले चांदीचे रुपये खण-खणायचे व तो खणखणाट तिच्या हृदयाच्या बेसूर धडधडींत मिसळून जायचा. त्यामुळं असं वाटायचं कीं, रुपयांची चांदी पिघळून तिच्या हृदयांत–तिच्या रक्तांत–सारखी ठिवकते आहे !....

सागवानाच्या रुंद पलंगावर ती पालथी होऊन लेटली होती. पाण्यांत खूप भिजल्यानें पातळ कागदासारखे, देहापासून अलग झालेल्या पतंगाच्या दोन पंखांप्रमाणें, खांद्यापासूनचे तिचे उघडे हात पडून होते. डाव्या वगलेंतली चामडी वारंवार केस काढण्याकरतां चालविलेल्या वस्त्र्यामुळं, काळी-निळी पडली होती. वाटत होतं, कीं तिथें केंस उपटलेल्या कोंवडीच्या कात-डीचा लहानसा तुकडाच ठेवला आहे ! खोली फारच लहान होती आणि तींत दुनियाभरचं सामान अस्ताव्यस्त पडलेलं होतं. पलंगाखालीं तीनचार सुकलेल्या चामड्याचे चपलांचे जोड पडलेले होते. त्यावर एक खरजेलं कुत्रं आपलं तोंड ठेवून चिरचिरत पडलेलं होतं. खरजेमुळं त्याच्या अंगावरले जागोजागचे केंस झडून गेले होते. व एखाद्या पायपुसण्यागत तें कुत्रें तिथें पडून होतें.

दुसऱ्या वाजूला फळीवर शृंगाराचं सामान पडून होतं.— गालांवर चोळण्याचा लाल रंग, लिपस्टिक, पावडर व केसांतल्या पिना ! जवळच एका लांब खुंटीवर पोप-टाचा पिंजरा लटकलेला होता. आपल्या पाठीवरच्या केसांत चोंच खुपसून वहुधा तो झोपीं गेला असावा ! संत्र्यांच्या सालींनीं पिंजरा भरलेला होता. अन् घाणेरडा वास मारणाऱ्या त्या सालटांवर लहान लहान काळ्या रंगाचे मुच्छर घोंगावत होते.

पलंगाजवळच एक वेताची खुर्ची होती. तिच्या पाठीचा भाग डोकं टेकल्यानं चिकट होऊं लागला होता. खुर्चीला लागूनच एक सुंदर तिपाई होती व त्यावर एक छोटासा ग्रामोफोन पण होता. ग्रामोफोनचं काळं कव्हर कसंसच झालं होतं अन् तिपाई-व्यतिरिक्त साऱ्या खोलीभर जिथें तिथें ग्रामोफोनच्या सुया पडलेल्या होत्या. ग्रामोफोनच्या अगदीं वर भिंतीला चार फ्रेम्स् टांगलेल्या होत्या अन् त्यांत वेगवेगळ्या चार व्यक्तींचे फोटो बसविलेले होते. ह्या तस्विरींजवळून जरा दूर अंतरावर, दरवाज्याजवळच्या डावीकडील कोपऱ्यांत, भडक रंगाचं एक गणपतीचं चित्र होतं. ताज्या अन् सुकलेल्या फुलांनीं चित्र अगदीं झांकून गेलं होतं. तरीहि कपड्याच्या ागावरून निवून तें चित्र तिथं लागलं आहेसं कळून येत होतं. चित्राशेजारींच तेलकट झालेली एक लहानशी फळी होती. तीवर एक तेलाची वाटी पडून होती. जवळच दिवा होता. वारं नसल्यानं त्याची ज्योत कपाळावरच्या टिळ्यासारखी सरळ



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

*दररोज रात्रीला कुणी ना कुणी पुरुष तिच्या रुंद सागवानी पलंगावर असायचा आणि सुगंधी — पुरुषांना टीक करण्याचे सारे गुरुमंत्र ठाऊक असूनहि नेहमींच आपल्या भावनांत वाहून जायची आणि फक्त एक तहानलेली स्त्री म्हणून उरायची ! प्रेम करायची तिची खूप इच्छा होती. सध्यांच तर तिच्यासमोर लटकावलेल्या तसबिरींतल्या चार पुरुषांबरोबर ती प्रेम करीत होती. प्रत्येक वेळेला तिला वाटायचं कीं ती फार चांगली आहे. पण हा चांगुलपणा पुरुषांजवळ कां नाहीं तें तिला कळत नव्हतं…….*

---

उभी होती; अन् वरच्या भिंतीवर धुराच्या वळवळणाऱ्या रेषा उठून दिसत होत्या.

बोहनीच्या वेळला दूरनंच ती दिव्यावरून हात ओवाळून आपल्या कपाळाला लावायची व रुपये चोळींत ठेवायची. तिचीं स्तनं चांगली पुष्ट असल्यामुळं तिनं तिथं ठेवलेले रुपये नेहमीं आरामांत पडून राहायचे. पण माधव पुण्याहून आला म्हणजे, खाटेच्या खालील खड्ड्यांत तिला पैसे लपवून ठेवावे लागत. तेवढ्याकरतांच तो खड्डा तिथं केला गेला होता. माधवपासून पैसे चोरून-लपवून ठेवण्याचा हा उपाय तिला रामलाल दलालानं सांगितला होता. माधव पुण्याहून आला म्हणजे तिचेवर आपला अधिकार गाजवतो हें जेव्हां त्याला कळालं तेव्हां तो तिला म्हणाला होता,

"त्याला साल्याला केव्हांपासनं तूं आपला यार बनवला आहेस ?...ही तर मोठी अजबच आशिकी–माशूकी आहे....साला एक पैसा आपल्या जवळून खर्च करीत नाहीं अन् मजा मारतो, वरनं पैसे पण घेऊन जातो.... सुगंधी, कुछ दाल में काला है, तुला मोहून टाकणारी कांहीं खास गोष्ट साल्याजवळ असली पाहिजे... सात वर्षे झालींत हा धंदा करतोंय्. तुम छोकरियों की सारी कमजोरियाँ जानता हूं मैं !"

असं म्हणून, मुंबईच्या निरनिराळ्या भागांत दहा पासून तो शंभर रुपयांपर्यंत मिळणाऱ्या एकशेंवीस मुलींची दलाली करणाऱ्या रामलालनं सुगंधीला सांगितलं, "साली, अपना पैसा यों बरबाद न कर. तुझ्या अंगावरचे कपडे न्यायलासुद्धां हा कमी करायचा नाहीं ! पलंगाच्या पाया-खालीं खड्डा कर अन् त्यांत ते सारे पुरून टाकीत जा; व तो आला कीं त्याला सांगत जा, 'तुझी शपथ माधव, सकाळपासनं एक फुटक्या कवडीचं सुद्धां तोंड पाहिलं नाहीं. जरा बाहेरनं एक कोप चहा अन् एक 'अफलातुन' बिस्कुट तर सांग. पोटांत भुकेमुळें उंदीर बोंबताहेत बघ' समजलीस ? माझे बाई, दिवस फार वाईट आहेत ! साल्या ह्या कांग्रेसनं तर दारुबंदी करून सारं मार्केटचं ठंडावून टाकलं. पण तुला तर कशी न कशी प्यायला मिळतेच आहे. देवाशप्पथ तुझ्या घरीं जेव्हां केव्हां दारूचा वास येतो व रिकामी बाटली पाहतों तेव्हां तेव्हां वाटतं कीं बस्स, तुझंच होऊन रहावं."

सुगंधीला साऱ्या शरीरांतून आपली छाती अधिक पसंत होती. जमुना तर एकदां तिला म्हणाली होती, "ह्या बॉंब गोळ्यांना जरा खालतनं बांधीत जा ! कांचोळी वापरीत जा, तरच ते घट्ट राहतील." सुगंधी ह्यावर हंसली होती. म्हणाली होती, "जमुना, तूं तर साऱ्यांनाच स्वतःसारखं समजतेस, दहा रुपयांत लोकं तुझीं हाडं मोडून जातात, तर तुला वाटतं...इतरांच्या बाबतीतहि तसंच होत असावं. कुणी अलत्या भलत्या ठिकाणीं हात तर लावून पाहा... अरे, हं, काल काय झालं तें सांगु तुला ? रामलाल रात्रीं दोनला एका पंजाब्याला घेऊन आला. रात्रभराचे रुपये तीस पक्के झाले...झोपायला गेलो तर मी दिवा विझवला... तर तो म्हणतो, 'रोशनी करो... रोशनी करो.' मी परत म्हटलं, 'यह, रोशनी क्या हुवा ?' तर उत्तरला, 'लाईट...लाईट.' याचा घाबरा आवाज ऐकून मला तर हंसूच आलं. सांगितलं 'भइ, मैं तो लाईट नहि करूंगी.' गडी उठला अन् लाइट ऑन केला. झटकन मीं चादर ओढून घेतली अन् म्हटलं, शरम नाहीं वाटत, पुरुष आहेस की कोण ?' तो परत पलंगावर आला तशी मी उठली अन् दिवा मालवून टाकला. तो परत घाबरायला लागला.... तुझी शपथ, मोठ्या मजेत रात्र गेली. कभी अंधेरा, कभी उजाला... कभी... साल्यानी सट्टयांत तीस रुपये जिंकले असावेत् ! म्हणून तर असा फुकट देऊन गेला,... जमुना, तूं अगदीं भोळी आहेस. अग ह्या लोकांना ठीक करायचे मोठे मोठे मंत्र माहिती आहेत मला."

खरोखरीच सुगंधीला असे गुरुमंत्र ठाऊक होते, अन् ते तिनं आपल्या एकदोन मैत्रिणींना सांगितले पण होते. बहुधा हा मंत्र तर ती साऱ्यांनाच सांगायची– "जर माणूस भला असेल, अधिक बोलणार नसेल, तर त्याला खूप छेडा, त्याचेशीं दुनियाभरच्या गोष्टी करा. त्याला छेडा, सतवा, गुदगुल्या करा, त्याचेशीं खेळा... दाढी ठेवणारा असेल तर त्याच्या केसांतून बोटं फिरवतां फिरवतां त्यांतले दोन चार उखडून पण टाका. पोट मोठं असेल त्याला थोपटा... त्याला एवढा वेळच देऊं नका कीं आपल्या इच्छेनं तो कांहीं करेल. खुष होऊन तो परतेल अन् तुम्ही पण वांचून राहाल.... गुपचुप रहाणारे पुरुष मोठे भयंकर असतात बाई.... हड्डी–पसली एक करतात त्यांचा डाव चालला तर !"

स्वतःला दाखवत होती तेवढी मात्र सुगंधी चलाख नव्हती. तिचीं गिऱ्हाइकं मर्यादित होतीं. पोरगी फारच भाऊक ! म्हणुनच एवढे सारे गुरुमंत्र ठाऊक असूनहि, ते तिच्या डोक्यांतून उतरून पोटांत शिरले होते. त्यामुळें, एक मूल होतांच तिच्या पोटावर वळ्या पडल्या होत्या... आपल्या खरजेल्या कुत्र्यानं पोटावर पंजाच मारला आहे असं तिला पहिल्यांदा त्यांकडे पाहून वाटलं होतं. जेव्हा एखादी कुत्री मोठ्या उपेक्षेनं तिच्या ह्या फालतु कुत्र्याजवळून जायची तेव्हां तो उपमर्द विसरण्याकरतां तो असाच जमिनीवर रेघा ओढायचा.

तशी सुगंधी चढलेलीच असायची. पण कुणी एखादी नाजूक गोष्ट–एखादा गोड शब्द– बोलायचा अन् ती झट् पिघळून आपल्या साऱ्या शरीरभर शहारायची. स्त्री-पुरुषांच्या शरीर संबंधाला तिचे विचार कवडी किंमत देत नसत





मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

पण उरलेले अवयव – सारेच्या सारे – वाईट तऱ्हेनं पछाडलेले होते. त्यांना थकवा हवा होता– अगदीं पिंजून टाकणारा, ठार मारणारा – गाढ झोंपेला विवश करणारा – थकवा हवा होता. थकून चूर-चूर झाल्यावर येणारी झोंप ! किती मजेदार असते ! .... कधीं असं वाटतं कीं तुम्ही अस्तित्वांत आहांत तर कधीं वाटतं कीं तुम्ही अस्तित्वांतच नाहीं. आणि ह्या असण्या-नसण्या मध्येंच कधीं कधीं असं वाटतं कीं तुम्ही हवेंत खूप उंच लटकले आहांत ! वर हवा, खालीं हवा, डाव्या बाजूला हवा, उजव्या बाजूला हवा, बस, हवाच हवा ! आणि मग अशा हवेंत दम कोंडणंहि तर एक निराळीच मौज आणते.

लहानपणीं ती जेव्हां आंधळी-कोशिंबीर खेळायची आणि आपल्या आईच्या मोठ्या संदुकांत लपायची तेव्हां दम कोंडल्यानं व वरो-वरच पकडल्या जाणाच्या भीतिनं, हृदयांत जी धडधड व्हायची ती किती मौज आणायची ?

सुगंधीला वाटायचं कीं आपलं सारं आयुष्य ह्या अशाच पेटींत बंद ठेवून कंठावं व शोध-णारांनीं भोंवतीं फिरत असावं. कधीं कधीं त्यांनीं तिला शोधून घ्यावं म्हणजे पर्यायानेंच तिलापण त्यांना शोधून काढण्याचा प्रयत्न करतां येईल. गेल्या पांच वर्षांपासून तीं जगत असलेलं जीवन हेंहीं एक प्रकारची आंधळी-कोशिंबीरच तर होती ! ..... कधीं ती कुणाला शोधून घ्यायची तर कधीं कुणी तिला शोधून घ्यायचा .....बस तिचं आयुष्य असंच जात होतं. ती ह्यांत खूष होती, कारण तिला खूप रहावं लागत होतं. दररोज रात्रीला कुणी ना कुणी पुरुष तिच्या रुंद सागवानी पलंगावर असायचा आणि सुगंधी—पुरुषांना ठीक करण्याचे सारे गुरुमंत्र ठाऊक असून, त्यांची कुठलीच गोष्ट मानायची नाहीं व मोठ्या कंटाळवाण्या पद्धतीनं त्यांना सामोरं जायचं ह्याचा परत परत निश्चय करू-नहि, नेहमींच आपल्या भावनांत वाहून जायची आणि फक्त एक तहानलेली स्त्री म्हणून उरायची !

दर रात्रीं तिला तिचा जुना वा नवा ओळ-खीवाला म्हणायचा, 'सुगंधी, मी तुझ्यावर प्रेम करतों.' आणि सुगंधी – तो हें सारं खोटं बोलतो आहे हें माहीत असूनहि – मेणासारखी पाघळायची. जणुं खरोखरीच तिचेशीं प्रेम केलं जात आहे ! प्रेम – किती सुंदर शब्द ! त्याला साराच्या सारा वितळवून, रोमरोमांत तो भरून जावा, अशा तऱ्हेची त्या द्रवानं मालिश करावी असं तिला वाटे. किंवा त्या शब्दांतच आपण जावं अशीहि ती इच्छा करायची. आलिं-गून – आलिंगून त्या शब्दांत दाखल व्हावं आणि वरनं झांकण बंद करून घ्यावं. कधीं कधीं प्रेम करायची इच्छा तिच्या मनांत तीव्रतर व्हायची तेव्हां तिला वाटायचं कीं शेजारी पड-लेल्या माणसाला कुशींत घेऊन थोपटूं लागावं. आणि बाळ-गाणीं म्हणून त्याला कुशींतच झोंपवून घ्यावं !

प्रेम करायची तिची खूप इच्छा होती. इतकी कीं तिजजवळ झोपणाऱ्या प्रत्येकावर ती प्रेम करूं शकत होती आणि मग तें निभावून पण नेऊं शकत होती. सध्यांच तर तिच्या समो-रच लटकणाऱ्या तसविरींमधल्या चार पुरुषां-बरोबर ती प्रेम करीत होती. प्रत्येक वेळेला तिला वाटायचं कीं ती फार चांगली आहे. पण हा चांगुलपणा पुरुषांजवळ कां नाहीं तें तिला कळत नव्हतं ..... आरशांत पाहतांना एकदां तिच्या तोंडांतून निघून गेलं होतं, "सुगंधी ! जगानं तुझ्याशीं कांहीं चांगला व्यवहार केला नाहीं !"

हें पांच वर्षांचं आयुष्य म्हणजे त्यांतले दिवस अन् रात्री, तिच्या जीवनांतल्या प्रत्येक क्षणाशीं बांधल्या गेल्या होत्या. तरीहि मनांत जपलेलं सुख तिच्या वांट्याला आलं नव्हतं. अन् एवढं असूनहि चाललेत तसेच दिवस जावेत अशी तिची इच्छा होती. रुपया-पैशाची लालच ठेवून तिला असे कुठले महाल उभारायचे होते ? दहा रुपये हा साऱ्यांकरतांच तिचा दर होता व त्यांतलेच अडीच रामलाल आपल्या दलालीचे घ्यायचा. साडेसात रुपये तिला रोज मिळूनच जात अन् तिच्या एकट्या जिवाला ते पुरेसेही होते. रामलालच्या म्हणण्यानुसार माधव तिच्यावर 'मालकी गाजवायला' पुण्याहून यायचा तेव्हां पंधराएक रुपये 'टॅक्स' ती त्याज-जवळून वसूल करून घ्यायची. तिला माधवशीं कांहीं 'तसं' झालं होतं म्हणूनच हा 'टॅक्स' होता. रामलाल दलालाचं म्हणणं ठीकच होतं. माधवमध्यें जरूरच कांहीं विशेष गोष्ट होती अन् त्यावर ती भाळली होती. सांगायलाच काय हरकत आहे ? . . . सुगंधीची अन् माध-वची जेव्हां पहिली भेट झाली होती तेव्हां तो म्हणाला होता,

"आपल्या शरीराची किंमत मागायला तुला लाज नाहीं वाटत ? कुठल्या वस्तूसाठीं तूं माझेबरोबर व्यवहार करते आहेस तें तुला माहिती आहे ? मी तुजजवळ कशासाठीं आलों ?..... छि: छि: छि ! दहा रुपये, अन् जसं कीं तूं म्हणतेस, अडीच रुपये दलालीचे. म्हणजे उरले साडेसात – उरलेत नं साडे-सात ? आतां ह्या साडेसात रुपयांच्या तुकड्यांच्या बदल्यांत तूं मला अशी वस्तू देणार म्हणून म्हणतेस कीं जी तूं देऊं शकत नाहीं अन् मी अशी वस्तू मागतोंय जी मी घेऊं शकत नाहीं मला बाई हवी आहे, पण काय अगदीं ह्याच वेळला तुला पण पुरुषाची आवश्यकता आहे ? मला तर कुठलीहि स्त्री चालून जाईल, पण काय मी तुला पाहिजेच आहे ? तुझामाझा संबंधच काय, कांहीं तर नाहीं ..... बस, हे दहा रुपये आहेत – ह्यांतले अडीच दलालाला जाणार आहे अन् बाकीचे इकडे-तिकडे विखरणार आहेत – हेंच तर आपल्या मध्यें वाजताहेत ..... तूंहि त्यांचा आवाज ऐकते आहेस अन् मीहि ! तुझं मन कांहीं निराळाच विचार करतं आहे अन् माझं कांहीं निराळाच ..... अशा गोष्टी कां न व्हाव्यात कीं ज्यामुळं तूं मला हवीशी वाटावी अन् मी तुला हवासा वाटावा ? पुण्यांत हवाल-दार आहे मी. महिन्यांतनं तीन-चार दिवसा-साठीं एकदां येत जाईन ..... ह्या घाणेरड्या बाजारू जगाला लाथाड. मी तुझा खर्च देत जाईन .... काय भाडं आहे ह्या खोलीचं ?"

माधवनं आणखीहि असंच तर खूप खूप सांगितलं होतं. सुगंधी तर त्यामुळं इतकी प्रभावित झाली होती कीं स्वतःला लगेच हवालदारीणच समजायला लागली होती. सारं सांगून माधवनं तिची खोली सजवून लावली होती. तिनं आणून लावलेलीं सारीं चावट चित्रं तिला न विचारतांच फाडून फेकून दिलीं होतीं व म्हणाला होता, 'सुगंधी मी असलीं चित्रं इथं असूं देणार नाहीं. आणि हें पाण्याचं मडकं ..... बघ तर किती घाण झालं आहे. आणि ..... आणि हे कपडे.....ह्या चिंध्या ..... ओफ् ! किती घाणेरडा वास येतो आहे ! उचलून बाहेर फेक त्या ..... आणि तूं आपल्या केसांची ही काय स्थिति केली आहेस ..... आणि ..... आणि .....'

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तीन तासांच्या गप्पागोष्टीनंतर सुगंधी व माधव आपापसांत अगदीं रंगून गेले होते व सुगंधीला वाटत होतं कीं ती हवालदाराला युगायुगांपासून ओळखते आहे. त्या वेळेपर्यंत कुणीहि खोलींतील घाणेरड्या वासाची, चिंध्यांची, नग्न चित्रांची दखलच घेतली नव्हती आणि कुणी तिला, तिचं एक घर असूं शकतं – तिथेंहि कांहीं घरगुती वातावरण असूं शकतं – ह्याचा विचार करायला आतां-पर्यंत संधीच दिली नव्हती. लोक येत अन् कुठल्याहि प्रकारचा घाणेरडेपणा तिथं आहे असं न वाटूं देतांच बिछान्यावर चढत. कुणी सुगंधीला म्हणत नव्हतं कीं, 'पहा तर, आज तुझं नाक किती लाल-लाल झालं आहे. कुठं सर्दी न होवो ..... थांब वरं, मी तुझ्यासाठीं औषध आणतों' माधव किती चांगला होता! त्याची प्रत्येक गोष्ट बावनकशी होती. किती खरं-खुरं त्यानं सुगंधीला समजावलं होतं आणि तिला माधवची आवश्यकता असल्याचं वाटायला लागलं होतं.... परिणामीं दोघांचा संबंध जडला होता.

महिन्यांतनं एकदां माधव पुण्याहून यायचा व जातांना नेहमीं सुगंधीला सांगायचा, 'बघ सुगंधी, पुन्हा तूं आपला धंदा सुरू केलास तर आपले संबंध तुटून जातील ..... एकदां जरी कुणा पुरुषाला तूं आपलेकडे थांबवलंस तर तुझ्या झिंज्या धरून मी तुला बाहेर काढीन. बघ, ह्या महिन्याचा खर्च पुण्याला जातांच मी तुला मनिऑर्डर करून पाठवून देईन.....हो, किती भाडं म्हटलंस ह्या खोलीचं ?.....'

पुण्याहून माधवनं कधीं पैसे पाठवले नव्हते व सुगंधीनं आपला धंदा बंद केला नव्हता. काय होऊन राहिलंय तें दोघंहि बरोबर ओळखत होते. सुगंधीनं कधींहि माधवला म्हटलं नव्हतं, 'काय टुर टुर करतोस तूं हीं ? एक फुटकी कवडी तरी दिली आहेस कां तूं कधीं ?' आणि माधवनंहि सुगंधीला कधीं विचारलं नव्हतं कीं, 'हा सारा माल, मी तुला कांहीं न देतांच तुजजवळ येतो कसा ?' दोघेहि खोटारडे होते. एक नकली जीवन दोघंहि जगत होते. पण सुगंधी खूष होती. खरं सोनं अंगावर ल्यायला न मिळणाऱ्या सोन्याच्या पॉलिशवरच तर खूष असतात ! ........

थकून-भागून त्यावेळेला सुगंधी झोंपलेली होती. ऑफ करायचा राहिलेला बल्ब तिच्या


तुमच्या ग्रंथागाराचें वैभव ठरतील अशीं
दलाल आर्ट स्टुडिओचीं

# ३ अभिमानास्पद प्रकाशनें

## चित्रांजली
१२ रंगीत चित्रें, मराठींतील प्रथितयश लेखकांनीं त्यावर केलेलें भाष्य; व अनेक दुर्मिळ रेखाचित्रें. किं. ७॥ रु. + र. पो. खर्च निराळा.

## भारताचे भाग्यविधाते
१४ रंगीत चित्रें, संशोधनपूर्वक केलेलें जीवनभाष्य; व अनेक दुर्मिळ रेखाचित्रें, किं. ७॥ रु. + र. पो. खर्च निराळा.

## अमृतमेघ
११ रंगदार कलाकृति व ११ रंगीत रेखाचित्रें. भारतांतील बारा महाकवींची अद्भुतरम्य अशी सचित्र ओळख
किं. ६ रु. + र. पो. खर्च निराळा.

*'दीपावली'च्या वर्गणीदारांना पहिलीं दोन पुस्तकें प्रत्येकीं रु. ५ मध्यें व 'अमृतमेघ' रु. ४ मध्यें मिळेल. त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ भरणारांना यांपैकीं एक पुस्तक सप्रेम भेट देण्यांत येईल.*

*एकमेव विक्रेते*-अ. अं. कुलकर्णी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, टिळक रोड, पुणें-२.

**दीपावलीचे आजच वर्गणीदार व्हा !**




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

डोक्यावर लटकत होता. त्याचा प्रखर प्रकाश तिच्या मिटलेल्या डोळ्यांवर येत होता. तरीहि ती गाढ झोपीं गेली होती.

तेवढ्यांत कुणी दरवाजा वाजवला. रात्रीच्या दोन वाजतां हा कोण? सुगंधीच्या स्वप्निल कानांना तो टकटक आवाज फार मोठा वाटला. दरवाजा जेव्हां जोरानें खट-खटूं लागला तेव्हां ती दचकून उठून बसली. दोन अलग प्रकारच्या दारू एकत्र करून पिण्यानं व दातांत अडकलेल्या माशाच्या कांट्यानं तिचं तोंड कसंसंच झालं होतं. धोत-राच्या पदरानं तिनं तोंडांतली घाण पुसून काढली, व ती डोळे चोळूं लागली. पलंगावर ती एकटीच होती. वांकून तिनं पलंगाखालीं पाहिलं. तिचं कुत्रं सुकलेल्या चपलांवर तोंड ठेवून चिरचिरत झोंपलं होतं व पोपट पाठी-वरल्या केसांत चोंच ठेवून झोंपी गेला होता.

दरवाजावर परत आवाज झाला, तशी सुगंधी उठली. वेदनांनीं डोकं अगदीं फुटायला झालं होतं. मडक्यातली एक नरवटी पाणी घेऊन तिनं आंचवलं व नंतर एक नरवटी पाणी ती गटागटा प्याली. दरवाजा किंचित् उघडून तिनं बाहेर झाकलं. आश्चर्यानं ती उद्‌गारली, "कोण रामलाल?"

दारावर आवाज देऊन थकलेला रामलाल संतापानं म्हणाला, "तुला काय ताप चढला होता कीं काय झालं होतं? तास झालाय बाहेर उभा राहून दरवाजा वाजवतोय. कुठं मेली होतीस?" मग एकदम आवाज खालीं आणून त्यानं हळूंच विचारलं, "आंत कुणी दुसरं नाहीं ना?"

सुगंधी 'नाहीं' म्हणून म्हणाली अन् राम-लालचा आवाज परत वर चढला, "दार कां नाहीं उघडत तूं? अरे वा, कमालच झाली. काय झोप आहे! एका एका पोरीला बोल-वायला असे दोन-दोन तास जर घालवावे लागले तर संपलाच आपला धंदा. आतां तूं माझं तोंड काय पाहतेस. झटपट हें पांढरें धोतर काढ अन् ती फुलाफुलांची साडी नेसून पावडर-फावडर लावून बाहेर चल. मोटारींत एक सेठ तुझी वाट पाहताहेत. चल चल, एक-दम झटपट!"

सुगंधी आरामांत खुर्चीवर बसली व राम-लाल आरशासमोर उभा राहून केंस सारखे करूं लागला. तिपाईवरली बामची वाटली घेऊन झांकण काढीत सुगंधी म्हणाली, "राम-लाल, आज माझ्या जीवाला जरा बरं नाहीं."

रामलालनं कंगवा खाली ठेवला व तो वळून म्हणाला, "सुरुवातीलाच सांगायचं होतंस तर–", कपाळावर बाम चोळत सुगंधीनं त्याचा गैरसमज दूर करीत म्हटलें, "तशी गोष्ट नाहीं रामलाल, मला असंच बरं नाहीं. फार प्याली होती."

रामलालच्या तर तोंडाला पाणीच सुटलं, "थोडी असेल तर आण तरी. जरा आम्ही पण तोंडाची चव बदलून घेतों."

बामची शीशी तिपाईवर ठेवीत सुगंधी म्हणाली, "वांचवली असती तर डोक्यांत ह्या झिणझिण्याच कशाला असत्या? बघ राम-लाल, तो बाहेर मोटरवाला आहे न, त्याला आंतच घेऊन ये."

"नहि मई, तो तर आंत नाहीं येऊं शकत. जन्टलमन माणुस आहे. गली बाहेर मोटर उभी करायलाच तर गृहस्थ घाबरत होते. तं कपडे-बिपडे कर व जरा गल्लीच्या वळणाशीं चल..... सारं कांहीं ठीक होईल."

साडेसात रुपयांचा व्यवहार होता. तशा स्थितींत सुगंधीनं कबूलच केलं नसतं पण तिला पैशांची फारच आवश्यकता होती. तिच्या शेजारच्याच खोलींत एक मद्रासी बाई राहत होती. नुकताच तिचा नवरा एका अपघातांत ठार झाला होता व तिला तिच्या तरुण पोरी-सह घरीं जायचं होतं. पण विचारीजवळ माडचाइतपतसुद्धां पैसे नव्हते व सुगंधीनं कालच धीर देत तिला म्हटलं होतं, "बाई, काळजी नको करूंस. माझा नवरा पुण्याहून येणारच आहे. त्याचे जवळून पैसे घेऊन मी कांहीं व्यवस्था करूनच देईन."

माधव पुण्याहून यायचा होता हें खरंच होतं, पण पैशाची व्यवस्था तर सुगंधीलाच करायची होती. ती उठली व झटपट कपडे करूं लागली. पांच मिनिटांत फुलाफुलांची साडी नेसून व गालांवर लाल पावडर चोळून ती तयार झाली. मडक्यांतल्या थंडचा पाण्याची अजून एक नरवटी तिनं रिकामी केली व मग रामलालबरोबर चालूं लागली.

गल्ली अगदीं शांत होती. खांबावरचे गॅसचे दिवे आतां पहिल्यापेक्षां खूपच कमी प्रकाश देत होते. त्या आंवळ्या प्रकाशांत गल्लीच्या शेवटच्या टोंकाला एक मोटर उभी असलेली दिसून येत होती.

कमी प्रकाशांत ती काळी मोटर छाये-सारखी वाटत होती व अशांत उत्तर रात्रींची ती रहस्यमय शांतता! सुगंधीला वाटलं, कीं तिच्या डोक्यांतल्या वेदना वातावरणाला पण घेरून आहेत. एक प्रकारचा आंवटपणा तिला हवेंत पण जाणवत होता, जणुं कांहीं ब्रँडी व बेवडा ह्यांच्या वासानं हवासुद्धां भारावून जाते आहे.

पुढं होऊन रामलालनं मोटरमधल्या माण-साला कांहीं सांगितलं. तेवढ्यांत सुगंधी पण मोटरजवळ येऊन पोंचली. जरा बाजूला होऊन रामलाल म्हणाला,

"घ्या, ती आलीच. फार छान पोरगी आहे. थोडेच दिवस झालेत हिला धंदा सुरूं करून." मग सुगंधीकडं वळून तो म्हणाला, "सुगंधी, इकडे ये. सेठजी बोला-वताहेत."

साडीच्या पदराचं एक टोंक बोटाला गुंडा-ळीत सुगंधी समोर आली व मोटरच्या दर-वाज्यापाशीं उभी राहिली. सेठजीनं टॉर्चचा प्रकाशझोत तिच्या चेहऱ्यावर फेंकला. क्षणं-भर सुगंधीचे डोळ्यांतला कैफ त्या प्रकाशानं उतरवून दिला. तेवढ्यांत कळ दाबल्याचा आवाज आला व प्रकाश गुडूप झाला. बरो-बरच शेठजीच्या तोंडांतून 'ऊंऽहुं' बाहेर आलं. मग एकदम मोटरचं इंजिन फडफडलं आणि कार दिसेनाशीहि झाली.

सुगंधी कांहीं विचार करूं शकण्यापूर्वीच मोटर निघून गेली होती. अजूनपर्यंत तिचे डोळ्यांत टॉर्चचा तीव्र प्रकाशच घुसून राहिला होता. ठीकपणें ती शेठचा चेहरासुद्धां तर पाहूं शकली नव्हती. हें सारं झालंच काय होतं? ह्या 'ऊंऽहुं' चा अर्थच काय होता? अजून तो शब्द तर तिच्या कानांतच गुंजून राहिला होता. काय अर्थ होता? – काय? –काय?

तेवढ्यांत रामलालचा आवाज ऐकूं आला. "पसंत नाहीं केलं तुला. अच्छा, तर मी चलतों आतां. फुकटांतच दोन तास दिले." तें ऐकतांच सुगंधीच्या हातांना, सुगंधीच्या पायांना एक जबरदस्त गम्मत करण्याची इच्छा झाली. कुठं होती ती मोटर? ..... कुठं होता तो सेठ?– तर 'ऊंऽहुं' चा अर्थ असा होता कीं त्यानं मला पसंत नाहीं केलं..... त्याची ऐशी .....





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पोटांतून शिवी आली व जीभेच्या टोंकावर येऊन थांबली. शेवटीं ती शिवी कोणाला देणार होती? मोटार तर निघून गेली होती. मागचा लाल दिवा अंधारांत बुडून राहिला होता. सुगंधीला वाटलं, कीं हा लाल निखारा म्हणजेच 'अुंऽहुं' आहे व तो तिच्या हृदयांत बॉम्बगोळ्याप्रमाणें उतरून राहिला आहे. तिला वाटलं कीं, जोरानं किंचाळावं, 'अरे ए शेठ, ओ शेठजी, जरा मोटर थांबीव आपली. बस, एका मिनिटाकरतां.' पण तो शेठ—थू त्याच्या जातीवर! दूर-दूर निघून गेला होता.

बाजारांतल्या मयाण शांततेंत ती उभी होती. अगदीं मोजक्याच प्रसंगांना वापरीत असलेली फुलाफुलांची ती साडी उत्तर रात्रीच्या हलक्या हलक्या हवेवर उडत होती. ती साडी अन् तिचा रेशमी स्पर्श तिला अगदीं नंगा वाटत होता. साडी हवेंत उडून सारखी 'अुंऽहुं-अुंऽहुं' करीत होती व तिला वाटत होतं कीं तिच्या अगदीं चिंध्या चिंध्या करून टाकाव्यात.

गालांवर तिनं पावडर लावली होती व ओठांवर लाल रंग. स्वतःला पसंत करून घेण्याकरतां आपण हा शृंगार केल्याचं तिच्या ध्यानांत आलं तशी ती शरमेमुळं घामानं चट-वच्चट होऊन गेली. ही अपराधाची भावना दूर करण्यासाठीं तिनं काय काय विचार केलेत!..... 'त्याला दाखवायला थोडीच मी मला सजवलं? ती तर माझी संवयच आहे. माझीच काय, साऱ्यांचीच संवय आहे....पण... पण.....ह्या रात्रीला.....दोन वाजतां....आणि रामलाल दलाल आणि.....हा बाजार.....अन् ती मोटर व टॉर्चचा तो प्रकाश?' हा विचार येतांच दृष्टि पोंचेल तिथं तिला वातावरणांत प्रकाशाचे डाग दिसायला लागले व हवेच्या प्रत्येक लहरींत इंजिनाचीं फडफडाट ऐकायला येऊं लागला.

शृंगार करतेवेळीं घाईघाईनें लावलेल, कपाळावरला बामचा थर, घाम आल्यानं तिच्या रंध्रारंध्रांत उतरूं लागला व आपलं कपाळ तिला कुण्या दुसऱ्याचंच असल्याचं वाटूं लागलं. हवेचा एक झोका तिच्या घामानं भरलेल्या कपाळाहून सरकला तेव्हां तिला वाटलं, कीं आपल्या कपाळावर थंडगार टिनाचा तुकडाच चिकटला आहे. डोक्यांतल्या वेदना तशाच्या तशाच होत्या, पण विचारांच्या गर्दीनं व त्यांच्या आवाजानं त्यांना दाबून टाकलं होतं. त्या वेदनांना विचारांच्या वर घ्यायचा तिनं बराच प्रयत्न केला पण ती त्यांत असमर्थ ठरली. तिला वाटत होतं कीं कुठल्याश्या वेद-नेनं आपलं अंग-अंग दुखूं लागावं. आपल्या हातांत, आपल्या पायांत, आपल्या पोटांत, आपल्या डोक्यांत, वेदनाच वेदना असाव्या. अशा वेदना कीं तिनें फक्त त्यांचाच विचार करावा व बाकी सारं विसरून जावं. विचारा-विचारांतच तिला वाटलं—कसली वेदना? कसलं दुःख?—क्षणासाठीं तिची बुद्धि—थोडी आकुंचित झाली व मग परत पसरली. काय होतं हें?.....धिक्कार! हा तर तोच 'अुंऽहुं' होता—कधीं तिच्या डोळ्यांत आकुंचित व्हायचा तर कधीं पसरायचा.

घराकडे जायला तिनं पाय उचलले होते तोंच एक कल्पना मनांत येऊन ती थांबली व विचार करूं लागली—'रामलाल दलालचं म्हणणं आहे कीं त्याला माझं रूप पसंत पडलं नाहीं. रूपासंबंधीं तर बोलला नाहीं, तो तर म्हणाला होता कीं, 'सुगंधी, तुला पसंत नाहीं केलं.' त्याला.....त्याला माझं फक्त रूपच पसंत नव्हतं ... नव्हतं तर काय, झालं? .....मलाहि तर कित्येक माणसांचं रूप पसंत नसतं ... अमावस्येच्या रात्रीं आलेला माणूस—किती कुरूप चेहरा होता त्याचा.! काय मी भुंवया वांकड्या नव्हत्या केल्या? माझ्या सोबत तो झोंपीं गेला तेव्हां मला त्याची घृणा नव्हती आली?.....उबग येतां येतां थांबली नव्हती?.....ठीक आहे, पण सुगंधी, तूं त्याला झिडकारलं नव्हतंस, तूं त्याला ठोकरून दिलं नव्हतंस.....तो मोटारवाला तर माझ्या तोंडावर थुंकला.....अुंऽहुं....ह्या अुंऽहुं चा दुसरा अर्थच काय?.....हाच ना, कीं सुसुंद्रीच्या डोक्याला चमेलीचं तेल! अुंऽहुं!.....हें रूप अन् मसु-रीची डाळ.....अरे रामलाल, तूं ही घोरपड कुठनं पकडून आणली होतीस? ह्याच रांडेची तूं एवढी तारीफ करीत होतास? दहा रुपये अन् ही स्त्री.....गधी काय वाईट ह्या पेक्षां!'

[उत्तरार्ध पुढील अंकीं]

## भारदस्त सावली !



• "अहो बाई सरका बाजूला, तुमच्या सावलीखालीं चिरडेल तो"—





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका




: ७ :

*दीपावलीच्या रसिक वाचकांना अत्यंत आवडलेली तुफान धाडसी अशी ही कमांडर **जेम्स कल्व्हर्ट** यांची दीर्घ प्रवासकथा व गेल्या कित्येक अंकांतून क्रमशः प्रसिद्ध झाली त्या या अद्‌भूत पण सत्य साहसकथेचा हा पुढील भाग !*

**अनु.: श्रीकृष्ण ठाकूर**

स्केट पाण्याच्या पृष्ठभागावर आली न आली तोंच एक छोटी होडी तिच्या बाजूला बांधली गेली आणि तिच्यावरील उतारूंचं स्केटवर स्वागत करण्यांत आलं. ते वायुदलाचे मेजर जोसेफ विलोटा. आदफावरील सर्वांत वरिष्ठ सैनिकी अधिकारी. 'मघाशी या शांत जलाशयांतून तुमचा पेरिस्कोप वर येत होता—इतकं चमत्कारिक दृश्य मी माझ्या आयुष्यांत कधींच पाहिलं नाहीं. अद्‌भूत—भयंकरच अद्‌भूत.' विलोटा गारठ्यानं काकडत होते—थकलेले होते. खालच्या गरम अशा वॉर्डरूममध्यें निकनें त्यानां नेलं व केक–कॉफी प्यावयास दिली.

नेहमीपेक्षां जास्त काळ तिथें रहावं लागणार हें गृहित धरून तुळच्या वर्फांत ठोकल्या गेल्या आणि स्केट त्या तुळचांना दोरखंडांनीं बांधून ठेवण्यांत आली. मुख्य ठाण्यापासून स्केट पन्नास यार्डांवर सुरक्षित होती, आणि पूर्वीच्या काळीं जहाज नेतां येणार नाहीं असा जो अफाट प्रदेश स्टीफनसननें आंखला होता त्याच्या मध्यापासून शंभर मैलांच्या आंत स्केट या क्षणीं उभी होती.

खालीं वॉर्डरूममध्यें विलोटांबरोबर आमच्या गप्पा झाल्या. ठेंगण्या, सुदृढ विलोटाचे केस हेवा करण्यासारखे, तपकिरी रंगाचे होते. आपल्या हुद्याचं फक्त एक सोन्याचं पदक त्यानें आर्टिक पद्धतीच्या वुलन हॅटला लावलं होतं. अन्यथा त्याच्या पेहेरावावरून तो मेजर आहे हें कळावयास कांहीं आधार नव्हता. आल्फाचा इतिहास तो निकला सांगत होता.

अलास्कामधील बॅरोच्या उत्तरेला पांचशें पन्नास मैलांवर १९५७ च्या एप्रिलमध्यें हें तरंगतं स्टेशन उभारलं गेलं. बॅरोमधील जेझुइट धर्मगुरु फादर थॉमस कनिंगहॅम व एअर फोर्सचे कर्नल ज्यो फ्लीचर या दोन आर्टिक तज्ञांनीं ही जागा पसंत केली. फ्लीचर व फादर कनिंगहॅम हे या प्रदेशावरून विमानांतून फिरले—पहाणी केली आणि शेवटीं त्यांनीं ही जागा पसंत केली. कारण इथून वहाणारं वर्फ त्यांना हवं त्या ठिकाणाहून जाणारं होतं, ब्रिगहॅम यंगच्या पद्धतीनं त्यानीं या जागेकडे बोट दाखविलं आणि म्हणाले 'हीच ती जागा' एव्हांना हें स्टेशन उजवीकडे वर्तुळाकार फिरत बॅरोपासून नवशें मैल ईशान्येला गेलं आहे.

या स्टेशनवर एकूण एकोणतीस माणसं होतीं. १९५८ च्या वसंत ऋतूपासून सहा महिन्याच्या बदलीनं तीं इथं आलीं. अर्धे नागरी लोक आणि अर्धे सैनिकी असे ते उमेदवार होते. विलोटा म्हणाले कीं, उन्हाळ्यांत इथं विमान उतरवणं शक्य नसतं. हिवाळा पूर्ण भरांत आल्याशिवाय इथून कुणाला कोणत्याहि परिस्थितींत हलवतां येणं शक्य नाहीं.

आणि आतां आपण विलक्षण थकल्यासारखं एकाएकीं मला जाणवूं लागलं. मेजरनं दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांच्या कॅंपवर भेटायचं कबूल केलं; आणि आम्हीं विश्रांती घेतली.










राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

शुक्रवारीं आकाश ढगाळ होतं, पण हवा बदार होती. आर्टिक महासागराच्या पद्धतीनं आम्ही तो दिवस किनाऱ्यावर विश्रांतीसारखा काढला. आल्फावर आम्हा तिघांना विलोटानी नेलं. एकटेपणा, शांतपणा आणि स्वच्छता या तीन गोष्टींची एका दिवसापूर्वीची जी आठवण होती त्याच्याशीं पूर्ण विरोधी असं हें वातावरण होतं. इथं मानवाच्या अस्तित्वाच्या खुणा ठायींठायीं दिसत होत्या. पांढऱ्या शुभ्र वर्फावर वंगणाची हिरवट–पिंगट रंगाची कोठी उठून दिसत होती. इथंही पाण्याची तींच छोटी छोटी तळीं होतीं पण त्यांचं तें विलोभनीय स्वरुप इथं नव्हतं. निरुपयोगी केरकचरा आणि घाणीनं त्याचं स्वरुप साफ बदलून गेलं होतं.

या स्टेशनमध्यें जवळजवळ बारा पिंगट–हिरवट झोंपड्या होत्या. त्यांतील एक जेवणघर, एक रंजन–दालन, कांहीं रहाण्यासाठीं म्हणून आणि कांहीं प्रयोगशाळा म्हणून उपयोगांत आणत असत. आम्ही चालत असतां मी त्यांना विचारलं "ह्या सर्व झोपड्यांच्या खालीं तुम्ही वर्फाच्या शिळा कां वसवल्या आहेत?"

'छेः छेः त्या कांहीं मुद्दाम वसवलेल्या वर्फाच्या शिळा नाहींत.' विलोटा हंसत म्हणाले 'अहो इथं पूर्वी वर्फ होतं. येत्या वसंतऋतूंत या झोपड्या जेव्हां इथं आणल्या तेव्हां या वर्फाची पातळी आतांपेक्षांहि दोनतीन फूट जास्त होती. पण इतक्या दिवसांत सूर्याच्या उष्णतेनें बाहेरचं वर्फ वितळलं आहे व या तंवूंखालचं वितळलं नाहीं. म्हणून तुम्हांला इथं वर्फाच्या शिळांवर या राहुंट्या वसवल्यासारखं वाटतं.'

वर्फाच्या उंच शिळांवर ठेवल्यासारख्या त्या झोपड्या वेड्यावाकड्या अशा अळंब्यांसारख्या दिसत होत्या. जसजसा उन्हाळा वाढत जातो तसतशा तंबूंतील त्या वर्फाच्या लाद्या उंचउंच होत जातात. त्यावर चढण्याउतरण्यासाठीं शिड्या कराव्या लागतात. पुढें जशा त्या लाद्या उंच होतात तशा त्या शिड्याहि उंच आणि लटपटत्या होतात. आणि प्रत्येक शिडीच्या पायथ्याशीं पाणी सांचून तिथें डवकं होतं. आणि तंबू गांठण्या-

# "T.V." – एक करमणूक !

श्री. माधव जोशी

( लंडन )

लंडनमध्यें टेलिव्हिजनवर कसे कल्पक कार्यक्रम असतात ह्याबद्दल फार थोड्यांना माहिती असेल. दर गुरुवारीं संध्याकाळीं ७ वा. Double your Money and Take it away नांवाचा एक कार्यक्रम असतो. चिठ्ठ्या टाकून श्रोत्यांमधून स्पर्धक निवडले जातात. सुमारें ५ किंवा ६ जण (किंवा जणी) निवडले जातात. नंतर स्पर्धकाच्या इच्छेनुसार त्याच्या आवडत्या विषयावरील प्रश्न विचारले जातात. एकूण प्रश्न तीन असतात व सर्व प्रेक्षकांच्या समोर हे विचारले जातात. तिन्ही प्रश्नांचीं उत्तरें बरोबर दिलीं कीं, एक पौंड (सुमारें, १४ रुपये) मिळतो. त्याच वेळीं त्याला विचारलें जातें कीं तुला १ पौंड पाहिजे कीं २ पौंडांसाठीं तुला प्रयत्न करायचा आहे ? अर्थात् २ पौंडासाठीं प्रयत्न करण्यासाठीं त्याला परत ३ प्रश्नांचीं उत्तरें बरोबर द्यावीं लागतात. तीं चुकलीं कीं दोनच काय पण प्रथम जिंकलेला १ पौंडही जातो. अशा तऱ्हेनें १ चे २, २ चे ४, ४ चे ८, १६, ६४ नंतर १२५, २५०, ५०० व शेवटीं १००० पौंड असा प्रकार असतो.

कार्यक्रमाचें स्वरूप विनोदी असतें. प्रश्न कठीण असतात. Hughe Green नांवाची एक असामी आपल्या एका सुंदर, आकर्षक मुलीबरोबर हा कार्यक्रम सादर करते. प्रचंड हंशा व टाळ्या सारख्या पडत असतात. विषयही शेती, शिकार, राजकारण, छायाचित्रण, शब्दांचे खेळ इत्यादि, इत्यादि असतात.

प्रत्येक प्रश्नासाठीं १० ते १५ सेकंद एवढा वेळ असतो. आतांपर्यंत लहानांत लहान एका १५ वर्षांच्या मुलीनें व मोठ्यांत मोठ्या एका ९९ वर्षाच्या वृद्ध गृहस्थानें १००० पौंड मिळविले आहेत !

समजा साहित्य ह्या विषयावर प्रश्न विचारले आणि आपल्या मराठी वाङ्मयाबद्दल ते असले तर प्रश्न कांहींसे असे असतील :

१ पौंड
(१) मराठी भाषेचे शिवाजी कोणाला म्हणतात ?
(२) पहाटेच्या वेळीं म्हणण्यांत येणाऱ्या गाण्यांना काय म्हणतात ?
(३) कुठल्या स्त्रीचे अभंग फार गोड असतात ?

२ पौंड
(१) 'मी' कादंबरी कोणी लिहिली ?
(२) परदेशांत जाणारी पहिली स्त्री-लेखिका कोण ?
(३) मराठींतील पहिले ख्रिश्चन लेखक कोण ?

४ पौंड
(१) नाटककार गडकरी ह्यांच्या कुठल्या नाटकांत विधवा-विवाहावर चर्चा केली आहे ?
(२) 'शिकारी' वाङ्मय लिहिणाऱ्या लेखकाचें नांव ?
(३) 'दाजी' कोणाचा मानसपुत्र ?

८ पौंड
(१) फुलामुलांचे कवि कोणाला म्हणतात ?
(२) 'बी' कवींचे सबंध नांव काय ?
(३) लोकमान्यांनीं तुरुंगांत कोणता ग्रंथ लिहिला ?

इत्यादि. इत्यादि.

शेवटीं १००० पौंडाचे प्रश्न असे असतील.

(१) "दौलत" कादंबरींतील नायिका नायकाबरोबर प्रेम करते परंतु ह्याला एका माणसाचा विरोध असतो. त्याचें नांव काय ?
(२) 'काळ' कर्ते परांजपे यांना एका लेखाबद्दल जामीन भरावा लागला होता. त्या लेखाचें 'शीर्षक' काय होतें ?
(३) 'ज्ञान हें विष कीं अमृत ?' हा निबंध कोणी लिहिला आहे व लेखकाचें निश्चित मत काय आहे ?





अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

साठीं लांब उडीची संवय करावी लागते.

डॉक्टर नॉरवर्ट उंटरस्टेनरवरोवर भोजन-गृहांत आम्ही कॉफीपान केलं. डॉ. उंटर-स्टेनर हे जन्मानं व्हिएन्नाचे असून वय चाळी-सच्या आंत असावं. वेधक व्यक्तिमत्वाचे हे संशोधक वॉशिंग्टन युनिव्हर्सिटीसाठीं संशो-धन करीत होते व त्यांच्या संशोधनाचा विषय होता: 'येथील वर्फखंडाच्या वाढीची व क्षीण होण्याची गति.'

आल्फा स्टेशनवरील शास्त्रीय कामाची माहिती त्यांनीं विशद केली: ध्रुवप्रदेशांतील वर्फाचे प्रदेश लहान होत चालले आहेत, अशी समजूत सध्यां प्रचलित आहे. या संबंधीचें हें संशोधन आहे. दहा हजार फुटांपेक्षां खोल अशा समुद्रतळाचे फ्लॅश वल्वनें घेतलेल्या फोटोंनीं आणि तेथील पाणी वगैरेंच्या नमुन्यांनीं त्या तळाविषयीचें संशोधन चालूं आहे. सूर्यावरुन भडकणाऱ्या ज्वाळा आणि उत्तर ध्रुवाकडे आभाळांत दिसणारा पहांटेचा प्रकाश (आरोरा वोरि-ऑलिस) यांच्यांतील संबंध निश्चित करण्या-साठीं आंतरराष्ट्रीय भू-भौतिकीसंशोधन वर्षाच्या योजनेतर्फे माहिती गोळा केली जात आहे, असेंहि त्यांनीं सांगितलें.

सहासहा महिने या निर्जन वर्फाळ प्रदे-शांत येऊन राहून ज्ञानाची उपासना कर-णाऱ्या डॉ. उंटरस्टेनरसारख्याचें आम्हांला फार कौतुक वाटलं—आदर वाटला. आपणा सर्वानांच आपलं जग जाणण्याची इच्छा असते; पण हे ज्ञानपिपासू लोक ज्ञानार्जना-साठीं आल्फासारख्या अज्ञात प्रदेशांत येतात—नाना संकटं सोसतात आणि ज्ञाना-र्जन करतात.

मेजर विलोटा माझ्याकडे आले व मला त्यांनीं विचारलं 'अमेरिकेंत तुम्हांला कोणाला फोन करावयाचा आहे काय?' मला वाटलं ते माझी थट्टा करताहेत. पण त्यांनीं मला रेडिओ स्टेशनवर येण्याचा आग्रह केला व तिथें कायतें दाखवतो असं ते म्हणाले.

रेडिओच्या तंवूंत एक हंसतमुख, झग-झगीत लाल शर्ट घातलेल्या एअर–फोर्स ऑपरेटरनं मला विचारलं 'तुम्ही कोणाला फोन करणार?' मी न्यू लंडनमधील रेअर ॲडमिरल फ्रेडरिक वॉर्डर यांच्यापासून सुरवात करायची ठरवलं. अटलांटिकमधल्या पाणवुड्यांच्या काफिल्याचे प्रमुख म्हणून ते नुकतेच ॲडमिरल वॉटकिन्सनच्या जागीं वदलून आले होते.

विलोटांचा तो ऑपरेटर लगेच कामाला लागला. गाण्याच्या सुराप्रमाणें आवाज काढीत तो म्हणत होता 'हॅलो अमेरिकेंतील कोणीहि ऑपरेटर! हें स्टेशन k17fla आहे उत्तर ध्रुवाच्या नजीक. इथून वोलतोय्...'

वेगवेगळ्या ध्वनीलहरींवर तो एकसारखा पुकारत होता. दोन हजार मैल दक्षिणेकडे असलेल्या अमेरिकेंतील एखादं स्टेशन मिळतं कीं काय तें तो पहात होता.

शेवटीं एकदाचा आमच्या स्पीकरवर अस्पष्टसा आवाज ऐकूं आला. ओरेगॉन संस्थानांतील पोर्टलन्ड येथील कुणी हौशी ऑपरेटर होता तो. ध्वनीलहरींचा सांधा नीट जुळवून घेतल्यावर शेवटीं एकदाचं त्याचं वोलणं आम्हांला थोडसं जास्त स्पष्ट ऐकूं येऊं लागलं. आम्ही त्याला रेडिओ सर्किट दूरध्वनी यंत्राला जोडून न्यू लंडन-मधील ॲडमिरल वॉर्डर यांना फोनवर वोलवायला सांगितलं.

मी जेव्हां परत अमेरिकेला गेलों तेव्हां माझा फोन ॲडमिरलना कोणत्या परि-स्थितींत मिळाला तें मला कळलं. जेव्हां माझा टेलिफोन गेला तेव्हां एका भोजन समारंभांत ते पुष्कळशा सन्माननीय पाहुण्यां-वरोवर भोजन करीत होते. दरम्यान शेजा-रच्या खोलींतला फोन वाजला. गोंधळ-लेल्या नोकरानें ॲडमिरलच्या शेजारील लेफ्टनंट थॉम्पसनला फोनकडे वोलावलं. लेफ्टनंट थॉम्पसन हा त्यांच्या हाताखालील अधिकारी.

थॉम्पसन हा तरुण असून कोणत्याहि आणिवाणीच्या प्रसंगीं आपण शांत रहातों असा त्याचा दावा आहे. निर्विकार चेहऱ्यानें तो मागें दरवाजांत आला व म्हणाला 'ॲडमिरल वॉर्डर तुमचा फोन. जेम्स कल्व्हर्टनें तो केलाय्. उत्तर ध्रुवाच्या जवळपास आपण कुठेंतरी आहोंत असं तो म्हणतो.'

आमच्या संभाषणाच्या शेवटीं शेवटीं—तें सारं कुटुंवविषयकच होतं—सिग्नल वारीक वारीक होऊं लागला, व आम्हांला एक-मेकांचं वोलणंहि ऐकणं अशक्य होऊं लागलं. शेवटीं सिग्नल नाहींसा झाला.

'मला ॲडमिरल रिकोव्हरशीं वोलायचं होतं. पण आमच्या विनंतीला मान देणारा कुणीहि हौशी ऑपरेटर आढळेना. मी, झगझगीत लाल शर्ट पेहेरलेल्या माझ्या हुशार मित्राचे, त्यानें आमच्यासाठीं केलेल्या श्रमांवद्दल आभार मानले. त्याचं तें काम सामान्य नव्हतं. त्याला घाम सुटला होता व त्याचा आवाज साफ वसून गेला होता.

जेवणापूर्वी थोडी वामकुक्षी घेण्यासाठीं जहाजावर आलों. मी जागा झालों तो फोनच्या वाजण्यानें. डेक ऑफिसर गाय शॅफर याचा तो फोन होता. 'कॅप्टन तुम्हाला उठविल्यावद्दल क्षमस्व. पण मला वाटतं तुम्ही इथं येऊन प्रत्यक्ष पहावं. वर्फानं आपली जागा सोडून पुढें यावयास सुर-वात केली आहे.'

मी लगेच तिथं गेलों. वर्फशिळांचं जलद येऊन वंद होणं आणि त्यावेळीं तिथं असलेल्या जहाजांच्या अडकित्त्यांत सांपडलेल्या सुपारीसारखा चुराडा होणं यावद्दल मी वाचलेल्या साऱ्या गोष्टी क्षणा-र्धांत माझ्या मनःचक्षूसमोर आल्या. जेव्हां मी व्रीजवर पोंचलों तेव्हां दूर अंतरावर होणाऱ्या वादळाचा अस्पष्टसा आवाज ऐकूं यावा तसा काहींसा आवाज ऐकूं आला. वर्फाच्या लांवलचक कडयाकडे शॅफरनें वोट दर्शविलं. 'गेल्या तासांत तो वर्फाचा कडा वर आला आहे,' तो म्हणाला.

हवेमध्यें कांहींच वदल झाला नव्हता. वारा अद्यापि सौम्य होता. मात्र आकाश किंचितसं काळवंडलं होतं. पण या प्रचंड महासागरांत कुठेंतरीं वर्फाचा डोंगर तयार होत होता. सावकाशीनं आणि ज्याचा प्रतिकार करतां येत नाहीं अशा मृत्यूच्या जवडयांत मरण्याचा धोका आमच्यासमोर होता. नजरेनं पाहिलं तर तें वर्फाचं पुढें सरकणं अतिशय मंदगतीनं होतं. पण तरीहि आम्ही उभे असलेलं हें तळं लहान लहान होतय् हें खास. नंतर एकाएकी




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# एक सेव्हिंग्ज बँक अकाउन्ट उघडा




## नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज

नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेजमध्यें सेव्हिंग्ज बँक अकाउन्ट उघडणें अत्यंत सोपे आहे. फक्त ५ रु. इतक्या लहानशा रकमेची जरूर आहे व तुम्हांला वर्षाला ३% व्याज मिळतें.

तुमच्या जवळपास असलेल्या आमच्या स्थानिक शाखेस आजच भेट द्या व पूर्ण माहिती विचारा. तुमचा कोणत्याहि स्वरूपाचा बँकिंगचा प्रश्न असो, येथें कार्यक्षमता व कार्यतत्परता तुमच्या सेवेस हजर आहे.



## नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज बँक लिमिटेड

संयुक्त राज्यांत संस्थापित ● सभासदांची जबाबदारी मर्यादित

NGB/59 B MAR

**मुंबईतील शाखा :**—९०, महात्मा गांधी रोड ; २७०/२७२, डॉ. दादाभाई नवरोजी रोड, (लॉइड्स ब्रँच) ; मिंट रोड, (मिंट रोड आणि सर फ़िरोजशहा मेहता रोडच्या कोपऱ्यावर) ; २१/२९, प्रिन्सेस स्ट्रीट, (लॉइड्स ब्रँच) ; ११७-११९, काझि सैयद स्ट्रीट, मांडवी ; ६५९फ, लिंकिंग रोड, सान्ता क्रुझ ; २/५७१, गोआलिआ टॅन्क रोड, कम्बाला हिल ; शिवाजी मंदिर, न. चि. केळकर रोड, दादर ; २४बि, क्लब रोड, भायकळा. **ठाणें :**—आग्रा रोड, कोलशाद रोड, (कॅसल मिल्सच्या जवळ).




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनिष्टसूचक आवाज होऊन बर्फाचा एक मोठा ढलपा तीस फुटांवर तुटला. आमच्या जहाजाच्या नाळीपासून तें अंतर कांहीं लांब नव्हतं. तो ढलपा जहाजाकडे येऊं लागला.

'गाय, सर्व खलाशांना बोलवा–आपल्याला इथून निघायचं आहे.' मी गंभीरपणें म्हणालों.

आमचीं पुष्कळशीं माणसं आल्फा स्टेशनला भेट द्यायला गेलीं होतीं आणि आल्फावरचीं पुष्कळशीं माणसं आमच्या 'स्केट'वर आलीं होतीं. आमच्या माणसांना बोलावणं जेतं न जातं तोंच ते निरनिराळ्या दिशांनीं घाईघाईनें जहाजावर येत होते.

नाइलाजानं आणि घाईघाईनं घेतल्या गेलेल्या माझ्या निर्णयानं आमच्या पुष्कळशा वेतांमध्यें विस्कळीतपणा आला. आल्फावरती आइस्क्रीम तयार करण्यासाठीं आवश्यक ती साधनसामग्री नसल्यानें आम्ही आमच्याकडचं उत्कृष्ट असं दहा गॅलन आईस्क्रीम त्यांना द्यायचं ठरविलं होतं. त्या बदली ते पांढऱ्या अस्वलाचं मांस देणार होते. आणि ही अदलाबदल अद्याप पूर्ण व्हायची होती. मी सौदा ठरवणाऱ्यांना सांगितलं कीं 'वेळ आहे तिथपर्यंत आइस्क्रीम तिकडे पाठवा. नंतर मी बिलोटाना आणि उंडरस्टेनर याना चिठ्या पाठवून घाईघाईनं इथनं जात असल्याबद्दल त्यांची माफी मागितली.

मिनिटामिनिटांनीं घड्याळ पुढें जात होतं. पण आमचीं सारींच माणसं कांहीं अद्याप माघारीं आलीं नव्हतीं. त्यामुळें मला फार काळजी वाटूं लागली. दूर अंतरावरून होणारा बर्फाचा आवाज संकटाची आगाऊ सूचना देत होता. शेवटीं एकदांचं, व्यवस्थितपणें मेणकापडांत गुंडाळलेलं पांढऱ्या अस्वलाचं मांस आलं. क्वॉर्टर मास्टर जॉन मेडाग्लिया यानीं तें आल्फाच्या मोटारबोटवरून स्केटवर घेतलं. 'वा! वा! आल्फावरचीं माणसं बरीच उदार दिसतात! कदाचित् त्यांना याची फारशी चणचण नसावी', तो म्हणाला.

बाकी सगळे आले पण वॉल्ट विटमन आला नव्हता. कडक हिवाळयांत विमानानं येणंजाणं सुरू होईपर्यंत त्याला आल्फामध्येंच अडकून पडावं लागणार अशी भीति मला वाटूं लागली. आतां त्या तळ्याचा आकार पूर्वीच्या निम्म्यानं झाला होता, आणि स्केट तळ्याच्या मध्यावर आली होती. शेवटीं एकदाची एक उंच लंबूस आकृति स्केटकडे धांवत येतांना दिसली. ती आकृति विटमनची होती. त्याला होडींतून स्केटवर पोचवण्यांत आलं, आणि आम्ही आल्फावरील माणसांचा निरोप घेतला. तीं माणसं तळ्याच्या आसपास होतीं. आमचा पुढचा प्रवास सुरू करण्यापूर्वी मी एकदां खालीं जाऊन पेरिस्कोपमधून पाहिलं. तळ्याच्या काठीं उभीं असलेलीं तीं माणसं पाहून माझ्या मनांत विचार आला, फ्रिड् जोफ् नानसेन यानं म्हटलं आहे कीं 'मानवाला ज्ञानाची तृष्णा असते. आणि जेव्हां ती तृष्णा नष्ट होते तेव्हां तो मानव–मानव म्हणून रहातच नाहीं.' नानसेनचं हें म्हणणं हीं माणसं आपल्या कृतीनं सिद्ध करीत आहेत.

समुद्रसपाटीपासून दोनशें फूट खालून सोळा नॉटच्या गतीनं चाललेला आमचा रात्रीचा प्रवास शांततेचा झाला. दुसरा दिवस शनिवार – सोळा ऑगस्ट. आम्ही या बर्फशीळांखालीं गेले सहा दिवस आहोंत.

लोमोनोसॉव्ह् पर्वतश्रेणींचा जास्त काळजीपूर्वक अभ्यास करण्यासाठीं आम्ही तिकडे माघारीं जायचं ठरविलं होतं. ग्रीनलंडच्या उत्तरेला जिथं त्या प्रचंड पर्वतश्रेणीला आम्ही छेदूं शकूं तिथें प्रथम जायचें आणि तिथून मागें उत्तर ध्रुवापर्यंत जायचं असें आम्ही ठरविलं. त्या रात्रीं जेवणाच्या वेळेपर्यंत आम्हांला वाटत होतं कीं त्या रात्रींत आम्ही ती पर्वतश्रेणी छेदूं शकूं. आणि रात्रौ अकरा वाजतां आर्ट मलॉय – समुद्रतळ या विषयाचा आमचा तज्ञ – यानं मला कंट्रोलसेंटरमध्यें बोलावलं. फॅरोमीटरवरील हालत्या काटचाकडे बोट दाखवून तो म्हणाला 'पर्वतश्रेणीची सुरवात झाली.' लोमोनोसॉव्ह् पर्वताच्या पायथ्याच्या टेकड्यांची वाकडीतिकडी बाह्यरेषा टेपवर सावकाशीनं उमटत होती. आणखी एका तासानं तो पर्वत आम्ही ओलांडला व परत एकदां ध्रुवाच्या दिशेनं प्रवासास सुरवात केली.

त्या पर्वतश्रेणीच्या वेड्यावाकड्या पाठीवरून आम्ही ती रात्र व दुसऱ्या दिवशींची सकाळ, प्रवास केला. आम्ही उत्तरेकडे – वरच्या पृथ्वीच्या टोकाकडे जात होतों. आमच्या खालून मागें जाणाऱ्या दऱ्या आणि प्रचंड खडक यांची बाह्यरेषा फॅरोमीटरची सुई दर्शवीत होती.

जसजशी ही पर्वतश्रेणी ध्रुवाकडे जात जाते तसतशी ती किंचितशी डावीकडे वळते. ध्रुवावर केलेल्या कांहीं टिपणांची आम्हांला पुन्हां खात्री करून घ्यायची होती म्हणून


कोणत्याहि रंगीत चित्रांचे ब्लॉक्स चांगले असल्याशिवाय त्यांत मूळ चित्राइतकी रमणीयता येत नाहीं !



आणि ही नवलाची किमया घडविणारें व अनेकरंगी आकर्षक व उत्कृष्ट ब्लॉक बनविणारें मुंबईचें प्रख्यात विश्वासार्ह केंद्र म्हणजे—

**बॉम्बे प्रोसेस स्टुडिओ**

क्रिसेण्ट चेंबर्स–टॅमरिण्ड लेन, फोर्ट–मुंबई–१.

फोन २५२९४५







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आम्ही ती पर्वतश्रेणी सोडून रविवारीं ध्रुवाकडे मोर्चा वळविला. ध्रुवाकडे समुद्रपृष्ठावर येतांना आढळणाऱ्या अडचणी अद्यापहि आमच्या स्मृतींत ताज्या होत्या. आम्ही स्केटची गती बारा नॉट केली, व वर येण्यासाठीं एखादं चांगलं तळं दिसतं का याची चौकशी सुरू केली. आणि एकाएकीं आर्टिक महासागरानें आमच्यावर कृपा केली. उत्तर ध्रुवापासून अवघ्या चाळीस मैलांवर आम्हांला सर्वांत मोठं असं तळं दिसलं. त्याचा व्यास जवळजवळ अर्धा मैल होता. आम्ही तिथें सहजासहजीं वर आलों. उत्तर ध्रुवाजवळ मोठमोठीं तळीं असतात हें स्पष्ट झालं. सर्वसामान्य ज्ञान – आणि वॉल्ट विटमन यानीं आम्हांला हें सांगितलं होतं, पण प्रत्यक्ष अनुभव हा त्याहूनहि महत्त्वाचा असतो.

निरनिराळ्या खोलीवरचे पाण्यावरचे नमुने विटमन् आणि ला फाँड यांनीं घेतले. या तळ्याचं समुद्रपृष्ठापासून बारा ते अठरा फूट खालचं पाणी गरम आणि ताजं असतं. त्यानंतर एकदम बदल होतो. खालचं पाणी खारट आणि थंड होऊं लागतं. या दोन थरांतील पाण्याची घनता (Density) फार निरनिराळी असते. ताज्या गरम पाण्यांत जी वस्तू बुडेल तीच वस्तू खालील थंड व जड पाण्यांत तरंगेल. जेव्हां आम्ही खालीं पाहिलं तेव्हां छोटे सफेद आर्टिक श्रिम्प प्राणी त्या थंड जड पाण्यावर इतस्ततः सरपटतांना दिसत होते. जणूं काय तोच समुद्रतळ होता. विटमन म्हणाला कीं या तळ्यांतला हा शुद्ध पाण्याचा थर एस्किमोना आणि उत्तरेकडील संशोधकांना त्रास देत असे. सील माशाला जर गोळी घातली तर केव्हां केव्हां तो या गोड्या पाण्यांतून खालीं जात असे व उपाशी शिकाऱ्यांची निराशा करून थंड-खारट पाण्यावर तरंगत असे – त्यांच्या हाताबाहेर- जात असे. वॉल्ट म्हणतो कीं एस्किमो लोक आपल्या बरच्यांना तरंगतं चामडं लावीत, त्यामुळें त्यांचं भक्ष्य हातीं येई.

आमच्या, समुद्रपृष्ठावर येण्याच्या दोन तीन वेळच्या मजेदार घटनांची मला आठवण झाली. शुद्ध पाण्याच्या भागांत आमचा पेरिस्कोप आला कीं तिथं दिसणारीं दृश्यं धुरकट व्हायचीं – अस्पष्ट दिसायचीं. काय होतय् हें काहीं मला तेव्हां कळेना. नंतर कळलं कीं त्या पाण्यांत वावरणारे अति छोटे कीटक पेरिस्कोपवर आल्यामुळें हें असं होतं. नानसेनचंसुद्धां हेंच म्हणणं आहे. त्याला आढळलं कीं उन्हाळ्यांत शुद्ध पाण्यांत उगवणाऱ्या डायाटॉम व आदजे या सूक्ष्म वनस्पती तेव्हां पाण्याच्या पृष्ठभागावर असतात, त्याच पुढें त्या थराच्या खालच्या बाजूला आढळतात. पेरिस्कोप जो धूसर आणि अस्पष्ट दिसतो तो यामुळेंच. आम्हांला पेरिस्कोपमधून दिसणारे व ज्यांचं आम्हाला कौतुक वाटलं ते श्रिप प्राणी या वनस्पती खाण्यासाठींच येत असावेत. आर्टिक प्रदेशांतील सील मासे हे या श्रिपना खातात; अस्वलं हे सील खातात आणि माणसं अस्वलांना खातात.

आम्ही डेकवर बोलत होतों तेव्हां पुढच्या टॉर्पेडो खोलींतून एकाएकीं चाललेल्या गडबडीनं आमच्या बोलण्यांत व्यत्यय आला. 'तें इथून घेऊन जा. तूं काय करणार याची मला पर्वा नाहीं. फक्त तें इथनं घेऊन जा.' एकजण ओरडत होता.

हा आवाज रे अटेनचा. पाठोपाठ जॉन मेडाग्लीयाचा हंसरा चेहरा वर दिसला. दोन दिवसांपूर्वी आम्हांला दिलेल्या अस्वलाच्या मांसाचा तुकडा त्यानें गच्च वरून ठेवला होता. 'आम्ही अटेनला हें मांस शिजव म्हणून कितीतरी विनवलं. पण त्यानें आम्हांला तिथून हांकलून लावलं! मेडाग्लीया म्हणाला. त्यानें तें पाकीट खालीं ठेवलं व कागद उघडला. त्याचा कुजट वास आमच्या मस्तकांत भिनला.

'आपणाला एव्हां तशी भूक नाहीं म्हणून – भूक लागते तेव्हांच या गोष्टीची मातब्बरी,' विटमन उत्तेजनपर स्वरांत म्हणाला.

'हो खरं आहे' मेडाग्लीया म्हणाला. 'तशी भूक मला कधीं न लागो.' त्यानें त्या तुकड्यांचा ढीग पाण्यांत फेकून दिला.

ते तुकडे खालीं गेले. अंदाजे पंधराफूटांपर्यंत गेले व जणू काय दोरीला बांधल्यासारखे तिथें लोंबकळत राहीले. 'ते पहा' मेडाग्लीया म्हणाला 'या महासागराला सुद्धां ते नको आहेत.'

आम्ही आणखी खालीं गेलों आणि उत्तरेच्या दिशेनं प्रवास सुरू केला. त्या रात्रीं अकराच्या सुमारास आम्ही परत उत्तर ध्रुवावर आलों — एका आठवड्यांतली आमची ही दुसरी खेप. तिथली खोली, पारदर्शकता, आणि पाण्याची उष्णता यांची काळजीपूर्वक नोंद करून मग आम्ही ध्रुवापासून दोन मैल दूर गेलों व तासाला अंदाजें बारा मैलांचा वेग ध्रुवाभोवतीं पूर्ण करून बहुधा पृथ्वीभोंवतालची सर्वांत वेगाची प्रदक्षिणा केली. इतक्या थोड्या वेळांत पृथ्वीभोवतीं यापूर्वी कोणीहि प्रदक्षिणा केली नसावी. या प्रदक्षिणेचा हेतु म्हणजे ध्रुवाभोवतालच्या प्रदेशांतील बारीकसारीक अद्यावत् माहिती मिळवावी हा होता. प्रत्यक्ष ध्रुवबिंदूवर समुद्रपृष्ठावर यावं हा माझा उद्देश मी सोडला नव्हता. निघण्यापूर्वी आम्ही शेवटची चाचणी घेत होतों. आम्ही जवळजवळ मध्यबिंदूवर आलों तेव्हां आम्हांला अत्यंत आशादायक असा उघड्या पाण्याचा पट्टा दिसला. आम्ही तिथें वर यावयास निघालों. पेरिस्कोपमधून सारं व्यवस्थित दिसत होतं. आम्ही पृष्ठभागाच्या अगदीं जवळ आलों. आणि मग मला आश्चर्याचा धक्का बसला! त्या तळ्याचा पृष्ठभाग साफ गोठून गेला होता – घट्ट झाला होता. त्या बर्फामध्यें, मधें मधें भेगा दिसत होत्या व त्यांतून आंत व्यवस्थीत उजेड येत होता. पण तरीहि तें बर्फ तिथें होतंच.

ही आमची सततची भीति होती – कीं आंधळेपणानं उघडं पाणी समजून आम्ही बर्फावर आपटून घेऊं. अगदीं पातळ अशा बर्फावर जरी आम्ही आदळलों तरी आमचा रेडिओ निरुपयोगी होऊन आम्ही मुके बनूं.

मी विल् काउहीलला झटकन् सांगितलं कीं पाणबुडी खालीं घे, वरती बर्फ आहे. प्रथम अडखळत, नंतर जणू काय तारेला बांधल्यामुळें लोंबकळत आहे अशी, स्केट वरच्या धोक्यापासून दूर झाली. मी रागानें अल् केहनकडे वळलों व विचारलं 'तुझ्या त्या यंत्रावर बर्फ दिसायचं बंद झालं की काय?'

अल् माझ्याकडे भांबावल्यासारखा पाहूं लागला व मग मला म्हणाला 'तुम्हीच इकडे या व यंत्राकडे पहा.' वरती स्वच्छ पाणी असल्याचं टेप दर्शवीत होती; तेव्हां आम्ही शांतपणें निष्कर्ष काढला कीं पातळ बर्फापासून होणारा प्रतिध्वनि आणि पाण्याच्या थराचा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

प्रतिध्वनि हे यंत्रावर जवळजवळ सारखेच उमटत असावेत. पण दिसणं जरी सारखं असलं तरी त्यांनीं आमचं भवितव्य कसं बदलून टाकलं असतं !

आम्ही ध्रुवाकडून ग्रीनलंड–स्पिटस्बर्गन सामुद्रधुनीच्या दिशेनं निघालों. आतां आम्ही माघारी घरीं चाललों होतों.

ध्रुवावरचं प्रचंड तरंगतं बर्फ ग्रीनलंड आणि स्पिटस्बर्गनच्या खाडींत घुसतं व त्या दोन बेटांच्या उत्तर किनाऱ्यांवर घट्ट बसून रहातं. या प्रदेशांतील हें बर्फ फार घातकी असतं. मात्र या बर्फमय प्रदेशांतील आमच्या दहा दिवसांच्या प्रवासांत नऊ वेळां आम्हांला योग्य अशी उघडीक मिळाली व आम्ही समुद्र-पृष्ठावर आलों.

आम्ही आर्टिकमधल्या झाकाळलेल्या आभाळाखालून आम्ही पुढं सरकलों होतों. आकाशांत सूर्य तेजानें तळपत होता. निरभ्र आकाशांतील सूर्य-शलाकांनीं तळ्यांतील पाणी चकाकत होतं. लोकरीसारखं भासणारं बाजूचं बर्फ चमकत होतं, आणि त्या तळ्याकांठीं बाहेर येणाऱ्या बर्फाच्या कडा जणूं काय चकाकते हिरेच आहेत असं वाटे. जणूं काय आम्हाला निरोप देण्यासाठीं आर्टिक महासागरानें आपल्या चेहऱ्यावर लांबरुंद हास्य आणलं होतं. जेव्हां आम्ही शेवटच्या तळ्यांतून समुद्राच्या पोटांत शिरलों तेव्हां मला खरोखरीच वाईट वाटलं. मला खात्री वाटली कीं आर्टिकचं मला घडणारं हें शेवटचं दर्शन होतं, आणि दुसरें असें कीं आर्टिकविषयीं मला फार प्रेम वाटूं लागलं आहे.

या सफरीमध्यें आमच्या जहाजावर, जरासा का मुळींच वांगडधिंगा नव्हता. जहाजावर सामान्यतः तो असतो. पण आतां मी कंट्रोल-सेंटरमध्यें गेलों आणि जें पाहिलं त्यानं माझी खात्री पटली कीं स्केटवरच्या माणसांच्या मनावरचा ताण निघून गेलेला आहे. जॉन मेडाग्लीयाची बलदंड आकृति हीं सर्वांच्या नजरेचा विषय होती. तो वाकत होता, काल्पनिक पेरिस्कोप हातांत घेत होता आणि तो समोवार फिरवीत होता. (क्रमशः)






वेलांटी • शेक्सपिअर

## दीड तपांतील उज्ज्वल प्रवाहिता

**'वेलांटी'** हा श्री. वा रा. कान्त ह्यांचा दुसरा कवितासंग्रह. साधारणतः एक संग्रह निघाल्यानंतर दुसरा संग्रह चारपांच वर्षांत रसिकांना पहावयास मिळतो. पण कान्तांच्या बाबतींत तसें झालें नाहीं. 'रुद्रवीणे' नंतर वेलांटी जवळ जवळ दीड तपाच्या प्रदीर्घ कालावधीनंतर बाहेर पडत आहे. १९४० ते १९६२ एवढ्या काल-खंडांतील निवडक अशा ६७ कवितांचा ह्या संग्रहांत समावेश केला आहे. समकालीनांच्या छाया किंवा काळाचीहि वाटचाल तपासून पाहण्याच्या दृष्टीनें आणि कान्तांचें स्वतःचें वैशिष्टय जोखण्याच्या संदर्भांत 'वेलांटी'चें वाचन व मनन हा एक महत्त्वाचा टप्पा ठरतो.

राजकवि तांब्यांच्या कवितांचे पुसट सूर जसे आरंभीच्या कांहीं कवितात आढळतात तसेच बालकवींच्या कांहीं लकबाहि दृगोचर होतात. विझव दीप साजणी, उभी मी सदनि दीप लावुनि, मी आलें, जोगी, तिमिरांत उमटलीं तेजाची पाउलें, मज माझाहि न अधिकार, आणखी एक पान गळालें, सख्या कां गायिलेंस तें गान, साजणी आज गातसें रात आणि अशा वेळी जागे कोण ? ह्या कवितांची नुसती शीर्षकें जरी वाचली तरी त्यांतील गीतांचा ढंग, भावार्तता, स्वप्नमधुर भाववृत्ति, हळवेपण आणि प्रणयभावनेंतील वेडी ओढ प्रकट होते आणि राजकवि तांब्यांचे संस्कार प्रभावीपणें जाणवतात.

कान्त शब्दांचा वापर फार वेधकपणें करतात. एखादे आल्हादक चित्र कुंचल्यांच्या चार दोनच फटकाऱ्यांत उभें करावें तसें मोजक्या शब्दांत कान्त आपल्या भाववृत्तीचा आविष्कार लीलया करूं शकतात.

**नेसुनिया आपुलेंच**
**हसूं आलीस दारांत**

अशी प्रेयसी आपल्यासमोर उभी करतात तर

**पण उभी कां तूं अशी ?**
**सोड दाराची चौकट**
**तुझ्या ओठांच्या रेषांशीं**
**माझी अडली ना वाट ?** ( वेलांटी )

अशी मुग्ध लाजरी प्रीतीहि ते व्यक्त करतात.

**कशी स्मिताची चांदणी वाट**
**इथें रात्रीला नसतो कांठ**

**या वाटेनें दुःख जगाचें युगानुयुगें चालत गेलें**
**एका रात्रीनं माझ्या बाहूंत तुला झोपेंत**
**हसूं आलें.**

ह्या ओळी किंवा

**झोप आता, नको बोलू**
**फूलमिटू झाले डोळे**
**अर्थ जागविता ओठीं**
**शब्द माझे पेंगुळले** चांदणे हे डहुळलें

**रंग पानाचा हिरवा**
**वाऱ्यांतुनी उसासतो**
**उगी चांदण्यांत अशा**
**डोळा पाण्याने भरतो** 'छाया चाफ्याची'

**परि रितें जागरण मनिंचें**
**जाळितें स्वप्न डोळ्यां**
**कोसळे गीत यात्री हा**
**जड शब्दांच्या वाटेंत** 'माती'

**जडावल्या पापण्यांत माझ्या**
**नीज नसे अन् जागहि नाही**
**सजल लोचनीं फूल सुखाचें**
**फुलतहि नाहीं, मिटतहि नाहीं** 'टिचकी'

ह्या उपरोक्त ओळी वाचतांना कान्तांच्या कविमनाचें दर्शन घडतें. आपल्या भाववृत्तीशीं इमान राखण्याचा त्यांचा प्रयत्न, तिला अनुकूल अशी शब्दकळा आणि अनुभवांत येणारी प्रत्ययकारिकता हें कान्त

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

आपल्या कवितेंत बुडून जातात, एका वेगळ्या धुंदीनें लिहितात म्हणून त्यांचे शब्द ताजे वाटतात. 'फुलतहि नाहीं, मिटतहि नाहीं' ह्या ओळी रसिकांच्याहि मनांत पिंगा घालतात.

'वेलांटी'मधील एक वैशिष्टच म्हणजे तिच्यांतील दीर्घ कविता. निळें कबूतर, चकमक झडली आहे, गोष्ट सांगतों एक फुलाची, नागासाकीचे अंघ, ही दुपार, ठिपके, वानरराजा आला दारीं, मी वाट आहे आणि– आणि वाहते शतद्रुती मी ह्या दीर्घ कवितांमध्यें जशा कांहीं प्रीतीच्या आहेत तशाच समाजांतील विषमता, माणुसकीला पोखरणारी दानवता, चीड, संताप, उद्रेक ह्यांचे आर्त स्वर, करुण रुदन, आणि बंडखोरी ह्यांचेहि सम्यग्दर्शन घडते. 'नागासाकीचे अंघ,' आणि 'वाहते शतद्रुती मी' आणि 'चकमक झडली आहे' ह्या त्यांच्या दीर्घ कवितांत आलेले विषयच असे आहेत कीं त्या काळच्या दारुण व कटु अनुभवानें एकतर माणसाची वाचाशक्ति तरी नष्ट होऊन शब्द खुंटतील किंवा शब्दांच्या धारा झरझरत राहतील. कान्तांच्या बाबतींतहि असेंच झालें असावें. त्यामुळें ह्या कविता दीर्घ असूनहि त्याच्यांतील तीव्र परिणामकारकता वा त्यांची धार कुठेंहि बोथटल्यासारखीं वाटत नाहीं. शब्दांचे निर्जीव सांगाडे जाणवत नाहींत. तर त्या कविता पिळवटून टाकतात. 'दुपार'मधील विरोधी टोंकें दर्शविणारीं शब्दचित्रें फारच बोलकीं उतरलीं आहेत. आगीच्या दुपारीं आईसोबत चालणारें अनवाणी पोर, दाजीवा, माळीण, टोपलीचें उसें करून झोपलेला पाटीवाला, दगड फोडणारे वडारी आणि उकिरड्यावर पोटाच्या खळगीसाठीं भांडणारें (माणूस व जनावर) वेडा आणि कुत्रा अस्वस्थ करतात आणि तरीहि प्रकट होणारा आशावादी सूर दिलासा देतो.

**मिटल्या डोळ्यांत स्वप्न नाही**
**देखल्या डोळ्यांत डोळेपण नाही**

असे 'निळे कबुतर' वाचतांना बालकवींच्या "भिंत खचली कलथून खांब गेला" ह्यानें उभें होणारें चित्र उभें राहतें आणि ह्या चित्रसाधर्म्यानें एक आगळाच प्रत्यय येतो. आषाढाच्या उद्या छायांत फिरणारा 'यक्ष' "अमुचा प्याला दुःखाचा डोळे मिटूनि प्यायाचा" असें कांहीं जाणवून जातो.

बोलीभाषेच्या शब्दांना कान्तांच्या कवितेंत फार चपखल स्थान मिळालें आहे. त्या त्या ठिकाणी ते अपरिहार्य वाटतातहि आणि हेंहि एक वैशिष्टयच म्हणावें लागेल.

ओला **शेव** पावसान–('गोड आंबट उगीर')
**सोगे** सुटले ढगाचे –('ओले हिरवे दिवस')
खूण खुरांची **पांदीत**–('स्पर्शे केसाळ काळोख')
उजाडता **झुंजुकचि**–('वानरराजा आला दारीं')
कीर्तिफुलांचें **गेंद** झेलशील –('सख्या, कां गायिलेंस तें गान?')
निःशब्द उडती उन्हाच्या **ऐन्यांत** –('सय')

अशीं कितीतरी उदाहरणें काढता येतील.

जवळ जवळ दीड तपाची कविता 'वेलांटी'त एकवटली असल्यामुळें कवितांच्या विषयांत विचार करण्याइतकी विषमता आढळणें स्वाभाविकच आहे.

**'परि आज तुझ्याविण दीन मराठी वाणी**
**मधुचषक भंगला, खिन्न उभी मधुराणी.**

अशा शब्दांनी त्यांनी माधवराव पटवर्धनांना 'अर्घ्य' अर्पण केलें आहे. ही कविता १९४० सालची. हाहि त्या काळच्या प्रभावाचा विशेष.

कान्तांची कविता प्रवाही आहे. प्रभावी आहे. नवे नवे बदल स्वीकारून वैशिष्टचं कायम ठेवण्याची तिची जिद्द आहे. तिचा स्वतःचा एक घाट आहे. आणि म्हणूनच श्री. वा. रा. कान्त ह्यांची ह्यापुढील कवितेची वाट आणि वाटचाल रसिक उत्सुकतेनें करतील हें खासच!

**केशव मेश्राम**

**वेलांटी**

ले.– **वा. रा. कान्त** प्रकाशक – मौज प्रकाशन गृह, पृष्ठें १२८, मूल्य – ४–५० रु.

---

## आटोपशीर रेखाटन

सोळाव्या शतकांत जन्माला आलेल्या या जागतिक कीर्तिच्या नाटककाराचें हें एक आटोपशीर आणि अप्रतिम चरित्र आहे. इंग्रजीचें वाचन अत्यंत त्रोटक असणाऱ्यांना तर हें पुस्तक म्हणजे परम लाभ वाटेलच परन्तु कॉलेजमध्यें अभ्यास करणाऱ्या आणि शेक्सपिअरच्या नाटकाचें अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना हें पुस्तक म्हणजे एक वरदानच ठरेल.

शेक्सपिअरच्या जन्मस्थानाची, बालपणाची हकीगत यांत लेखकानें थोडक्यांत दोन प्रकरणांत रंगविली आहे. त्या संबंधीच्या वेगवेगळ्या पंडितांच्या कल्पना व त्यांचे विवाद्य मुद्दे यांचाहि थोडक्यांत परिचय करून दिला आहे. नंतर त्या काळांतलें लंडन शहर, त्याकाळची रंगभूमी आणि प्रेक्षक यांचें विवरण केलें आहे. शेक्सपिअरच्या काळचे नाटककार आणि त्यांची नाटकें यांचा परिचय करून देऊन त्याकाळच्या प्रेक्षकांची अभिरुची काय होती. आणि त्या अभिरुचीला वेगळें वळण लावण्याचें कठीण काम शेक्सपिअरनें कसें केलें याचेंहि ह्या पुस्तकांत मार्मिक विवेचन केलें आहे.

शेक्सपिअरचीं नाटकें त्यानें कोणत्या काळांत लिहिलीं कोणत्या परिस्थितींत लिहिलीं हें सांगताना एलिझाबेथ राणी, तिच्या आवडी निवडी, तिचें प्रेम–प्रकरण, इसेक्सची बंडाळी त्याला दिलेली फांशीची शिक्षा, ही सारी हकीगत श्री. आरोसकर यांनी अतिशय आकर्षकपणें लिहिली असून त्याचा परिणाम कळत वा नकळत शेक्सपिअरच्या नाटकांवर कसा झाला हेंही दाखवून दिलें आहे.

शेक्सपिअरच्या जीवनाचा विचार करतांना अखर 'शेक्सपिअर हा जीवनाचा भाष्यकार आहे काय'? या डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या प्रश्नाला उत्तर देण्याचा केलेला प्रयत्न अगदी पोचट वाटतो. शेक्सपिअरने असा दावा केला नाहीं म्हणून हा प्रश्नच अप्रस्तुत आहे हें दाखविणे भ्रामक आहे. दुसरी गोष्ट अशी कीं शेक्सपिअरच्या किमान चार सुखान्तिका आणि चार शोकान्तिका यांचें रसग्रहण शेक्सपिअरच्या या चरित्रांत येणें आवश्यक होतें असें मला वाटतें. संदर्भग्रंथांच्या सूचींत A. C. Bradley च्या Shakespearean Tragedies या पुस्तकाचा निर्देश नाहीं याचें देखील सखेद आश्चर्य वाटलें. या पुस्तकाच्या पुढील आवृत्तींत या गोष्टी याव्या अशी माझ्यासारख्या त्यांच्या आणि शेक्सपिअरच्या चाहत्यांनी विनंती केली तर ती अस्थानी ठरूं नये.

**श्रीपाद भागवत**

**शेक्सपिअर**

ले. : **अजय आरोसकर**

प्रकाशक : व्होरा आणि कंपनी, मुंबई,
मूल्य–रु. २–००

**दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमीं २ प्रति पाठवाव्यांत म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते. –संपादक**

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

भरून राहिलेला असतो. त्यांत केवळ काव्य तर असतेंच पण त्याहिपेक्षां अधिक आकर्षक असते ती त्यामधली विलक्षण प्रतिभासृष्टि. आणि पुष्कळदां ' हायकू 'मध्यें प्रत्यक्ष जें सांगितलेलें असतें त्याहिपेक्षां त्यांतून जें सूचित होतें तें अधिक काव्यमय असतें. ' हायकू ' वाचल्यानंतर मनांत अनन्त भावकल्लोळ उसळतात. आणि त्या भावकल्लोळांचा अनुभव घेण्यासाठींच वाचक पुष्कळदां ' हायकू '-कडे वळतो. असा हा मोठा विलक्षण काव्यप्रकार आहे. साधा तरीही अभिजात आणि केवळ तीन ओळींत व बारा चौदा शद्बांत वरेंच कांहीं वाचकाला सांगणारा, त्याहून वरेंच कांहीं सूचित करणारा नि त्यापेक्षांही अधिक कांहीं त्याच्या अर्धसुप्त मनांत चाळवून जाणारा हा गूढ कविताप्रकार जपानी रसिकांना अत्यंत प्रिय आहे. ' हायकू 'ची तुलनाच करावयाची झाली तर ती जपानी रेखाचित्रांशींच करतां येईल. कारण रंगरेषांचें तेंच नाजूक सूचक सौंदर्य ' हायकू 'त असतें. ' हायकू ' हा कविताप्रकार प्रथम केव्हां व कसा अस्तित्वांत आला या संबंधीं जपानमध्यें एक मनोरंजक दन्तकथा प्रचलित आहे. असें म्हणतात कीं १७७२ सालीं जपानमध्यें 'काशिवावारा' नांवाच्या एका खेड्यांत एक छोटा मुलगा राहत असे. 'यातारो कोवायाशी' हें त्या मुलाचें नांव. हा मुलगा सदैव एकाकी आणि उदासवाणा असे. कारण त्याची आई तो तीन वर्षांचा असतांनाच मरण पावली होती आणि त्यानंतर घरांत सावत्र आईचा प्रवेश झाला होता. ही सावत्र आई पहिल्यापासूनच याता-

# हायकू – एक जपानी काव्यप्रकार

—शांता शेळके

हायकू हा एक जपानी काव्यप्रकार आहे. हा कविताप्रकार अत्यंत प्राचीन असून त्याचें मूळ जपानी संस्कृतीच्या नि परंपरांच्या धुक्यांत बुडून गेलें आहे. आपल्याकडचीं छोटीं संस्कृत सुभाषितें असतात त्याप्रमाणेंच हायकू ही एक अगदी चिमुकली कविता असते. दहा बारा शद्बांपेक्षां तिचा विस्तार अधिक नसतो. मात्र संस्कृत सुभाषितांमध्यें कल्पना-चमत्कृतीवर, शाद्बिक श्लेषांवर, उद्बोधनावर, नीतियुक्त तात्पर्यावर भर दिलेला असतो तर हायकूमध्यें एक विचित्र, गूढ, तरल सौंदर्य निर्माण करण्याकडे कवीची अधिक प्रवृत्ती असते. हें सौंदर्य कधीं निसर्गांतील एकाद्या दृश्याचा चित्रणांतून साधलेलें असतें तर कधी विशिष्ट नैसर्गिक पार्श्वभूमीवर मानवीमनांत उठणारे जे चंचल तरंग असतील ते पकडून त्यांतून ते व्यक्त केलेलें असतें. जीवनांतील पळते सौंदर्यक्षण तरल शद्बांत बांधून ते साकार करण्याकडे हायकू या काव्यप्रकाराची विशेष प्रवृत्ती असते. कांचेचें एकादें नाजूक, इंद्रधनुष्यासारख्या चित्रविचित्र रंगाचें मांडें, तंतुवाद्यावर छेडलेला एकादा मंजुळ सूर, पावसाच्या सरीनंतर पडलेल्या उन्हाचा तलम झिरझिरीत प्रकाश याचें सौंदर्य जसें हळुवार असतें तसाच एक कोमल आणि तरल गोडवा या 'हायकू'मध्यें

रोशीं तुटकपणें व दुज्या भावानें वागत असे. पुढें तिला स्वतःचें मूल झाल्यावर तर ती यातारोचा अगदीं छळच करूं लागली. या छळामुळें यातारो मनांतून अतोनात कष्टी असे. आणि त्याच्या त्या सततच्या खिन्नपणामुळेंच कीं काय, इतर मुलें त्याला सहसा आपल्या खेळांत घ्यावयास तयार नसत. एकदां सर्व मुलें अशींच खेळांत दंग झाली होतीं आणि त्यांनीं वगळलेला यातारो उदास व केविलवाणा चेहरा करून बाजूला एकटाच बसला होता. त्याच वेळीं जवळच्या एका झाडावरल्या घरट्यांतून चिमणीचें एक लहानसें पिलू टपकन् खालीं पडलें. त्या पिलाला पाहून यातारोचें अन्तःकरण उचंबळून आलें आणि त्यानें झटकन् पुढील 'हायकू' तेथल्या तेथें रचून म्हटली—

**आपण दोघे खेळूं संगे**
**ये चिमणीच्या पिला**
**तूं ही माझ्यापरी पोरका**
**आई नाहीं तुला !**

चिमणीच्या पिलावर 'हायकू' रचणारा हा छोटा मुलगा पुढें मोठेपणीं एक सुप्रसिद्ध कवि झाला. ' इसा ' या नांवानें त्यानें



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

आपल्या 'हायकू' लिहिल्या. आणि त्या विशिष्ट काव्यप्रकारांत त्याच्याइतका श्रेष्ठ आणि लोकप्रिय कवि दुसरा कोणीहि आज-तागायत झालेला नाहीं. छोट्या यातारोच्या अंगची कवित्वशक्ति पाहून त्याच्या शाळेंतल्या गुरुजींनीं त्याला कविता–लेखनाला प्रोत्साहन दिलें. पण यातारोची सावत्र आई इतकी दुष्ट होती कीं तिनें त्याला शाळेंतूनच मुळीं काढून टाकलें. इतकेंच नव्हे तर दिवस-भर शेतांत काम करून घरीं परत आलेल्या यातारोला रात्रीं जर कांहीं लिहा-वाचावेसें वाटलें तर ती खोडसाळ आई त्याला दिवा सुद्धां ठेवायला परवानगी देत नसे.

या परिस्थितींत यातारोला घर नकोसें झाल्यास त्यांत नवल कसलें? वयाच्या चौदाव्या वर्षीच त्यानें घर सोडलें आणि तो ईडो या शहरीं पळून गेला. ईडो म्हणजेच आजचें टोकियो. त्या प्रचंड शहरांत पडेल तें काम तो करूं लागला. कित्येकदां त्याला तेथें फाकेही पडत. पण आपला कवितेचा नाद त्यानें सोडला नाहीं. हळूं हळूं त्याच्या कवितेला लोकप्रियता मिळूं लागली आणि १७९८ सालीं, म्हणजेच वयाच्या पस्तिसाव्या वर्षी इसा हा जपानमधला एक श्रेष्ठ कवि मानला जाऊं लागला. परंतु प्रसिद्धी मिळाली तरी इसा हा स्वतःला एक खेडवळ माणूसच मानीत असे. आपल्या खेडेगांवचें विशिष्ट वातावरण, तेथील शेतें, आपला घराजवळचा विलो वृक्ष यावर त्यानें अनेक 'हायकू' लिहिल्या. विलो वृक्षावर त्यानें लिहिलेली ही एक 'हायकू' पहा—

**स्नेह शून्य घर, परि दाराशीं**
**सळसळते पालवी**
**विलो वृक्ष हा पसरुनि बाहू**
**प्रेमें मज बोलवी!**

इसाचे वडील मरण पावल्यानंतर सुद्धां त्याच्या सावत्र आईचें मन त्याच्याविषयीं पूर्वीइतकेंच कठोर राहिलें. इसाला वारस ठरविणारे आपल्या पतीचें मृत्युपत्र खोटें पाडण्याची तिनें सतत बारा वर्षे धडपड केली. शेवटीं बारा वर्षांनंतर मोठ्या मुष्कि-लीनें वडलोपार्जित इस्टेटींतला अर्धा वांटा इसाला मिळाला. त्याचें राहतें घर सुद्धां मध्यें आडवी भिंत टाकून अर्धेच त्याच्या वांट्याला आलें. वयाच्या एकावन्नाव्या वर्षी इसानें आपल्या खेड्यांतल्याच एका अठ्ठावीस वर्षांच्या मुलीशीं लग्न केलें आणि 'काशिवावारा' येथेंच तो कायमचा स्थायिक झाला. त्याला पांच मुलें झालीं. पण तीं सारीं अल्पवयांतच एकामागून एक निधन पावलीं. नऊ वर्षांच्या वैवाहिक आयुष्यानंतर इसाची बायकोही मरून गेली. इसाचें आयुष्य पुन्हां एकाकी आणि उदासवाणें झालें. त्याच्या मनाची या वेळची उध्वस्त आणि विकल अवस्था त्याच्या या सुप्रसिद्ध 'हायकू'मध्यें चांगल्या रीतीनें प्रकट झाली आहे. इसा म्हणतो—

**कृमि किटक हो, विरहशोक हा–**
**वृथा, अश्रु हे वृथा**
**स्वर्गीं जुळला प्रणय तयाही**
**जाळी विरहव्यथा!**

इसाचें जपानवरचें प्रेम कसें उत्कट होतें त्याचा प्रत्यय त्याच्या पुढील 'हायकू'वरून येईल.

**या अमुच्या देशाची शोभा**
**स्वर्गाहून सुंदर**
**गवतालाही फुटतो येथे**
**चेरीचा मोहर!**

अठराशें सत्तावीस सालच्या नोव्हेंबर महिन्यांत एकोणीस तारखेला 'काशिवावारा' गांवीं खूपच हिमवृष्टि झाली. सारा गांव बर्फाच्या पडद्याखालीं झांकून गेला. इसा त्या दिवशीं बाहेर हिंडा-वयाला गेला होता. तो त्या हिमवृष्टींत सांपडला. घरीं येतांच त्यानें बिछाना गांठला. त्याचें घर पूर्वीच आगींत जळून गेलें होतें म्हणून तो एका गोदामांत राहत होता. त्याच रात्रीं, वयाच्या पासष्ठाव्या वर्षी तो झोपेंतच हें जग सोडून गेला. इसानें वयाच्या नवव्या वर्षी पहिलें 'हायकू' लिहिण्याची दन्तकथा जशी प्रचलित आहे तशीच अंत्यसमयीं त्याच्या उशीखालीं ही एक 'हायकू' सांपडल्याची दन्तकथाहि ऐकिवांत आहे.

**दाट हिमाचा थर जो माझ्या**
**असे बिछान्यावरी**
**तीही प्रभुची कृपा! वर्षतो हिमहि**
**तोच भूवरी!**

'हायकू' हा काव्यप्रकार जपानमध्यें किती लोकप्रिय आहे याची आपल्या वाचकांना कल्पनाही करतां यावयाची नाहीं. 'हायकू' नांवाच्या एका मासिकाच्या दरमहा वीस हजारांवर प्रती खपतात आणि 'हायकू' पद्धतीच्या चिमुकल्या कविता दर वर्षी एक लाख तरी लिहिल्या व छापल्या जातात.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

इतके दिवस केवळ जपानी रसिकांनाच ज्ञात असलेल्या या काव्यप्रकारानें आतां पाश्चात्त्यांचेंही चित्त वेधून घ्यावयास प्रारंभ केला आहे. 'हायकूशीं तोंड ओळख' नांवाच्या एका नव्या पुस्तकाच्या अमेरिकेमध्यें गतवर्षी दहा हजाराहून अधिक प्रती खपल्या. जेथें कवितेचें पुस्तक पांच हजारापर्यंत खपले म्हणजे त्यानें लोकप्रियतेची पराकाष्ठा गांठली असें समजलें जातें तेथें येवढी विक्री होणें हा एक खरोखर फारच मोठा विजय समजला पाहिजे. अमेरिकेप्रमाणेंच इंग्लंडमध्यें देखील सर्वसामान्य वाचकांत हायकूबद्दल दिवसेंदिवस अतिशय कुतूहल निर्माण होत आहे. 'सण्डे टाईम्स' या वृत्तपत्रानें 'हायकू'ची चढाओढ लावली तेव्हां तींत भाग घेण्यासाठीं जवळजवळ अडीच हजारांहून अधिक 'हायकू' प्रविष्ट केल्या गेल्या होत्या.

अमेरिकेमध्यें हॅरोल्ड जी. हेण्डरसन यांनीं कांहीं जपानी 'हायकूं'चें नुकतेंच इंग्रजींत अनुवाद केले आहेत. हेण्डरसन हे कोलंबिया युनिव्हर्सिटींत जपानी भाषेचे प्राध्यापक होते. आतां ते सेवानिवृत्त झाले आहेत. त्यांनीं केलेल्या अनुवादांमुळें अमेरिकेंत 'हायकू' या काव्य प्रकाराला विलक्षण लोकप्रियता प्राप्त झाली आहे. हेण्डरसन यांनीं केलेल्या अनुवादांतले कांहीं निवडक अनुवाद येथें दिलें आहेत.

**मंदिरांतली प्रचण्ड घण्टा**
**नाद घजेना करूं**

**तिच्या कडेवर गाढ झोपलें**
**एक फूलपांखरूं**

**चुकलें बालक आक्रंदत हें**
**अंधारीं धांवतें**

**आधारास्तव पकडूं पाही**
**काजवेच चमकते !**

**तीन दिसांची कोर शशीची**
**थरथरते अंबरीं**

**सुरकुतली, जाहली वांकडी !**
**—कसली थंडी तरी !**

**चेरीच्या पाकळ्या थरारत**
**गळती भांबावुनी**

**प्रचण्ड वादळ घोंघावत ये**
**वेगानें मागुनी**

**श्वेत गव्हाचें हलतें डुलतें**
**सळ सळ वारा करी**

**टांके मारित तया तरंगे**
**फूलपांखरूं वरी !**

**टक लावुनिया चंद्रावरतीं**
**शिणले जे लोचन**

**क्षण विश्रांती त्यांस द्यावया**
**मेघ येति दाटुन !**




**येइ अचानक पायांखाली**
**मृत पत्नीची फणी—**

**तीव्र हिमाची थंड वेदना**
**उठली हृदयांतुनी !**

**ये शरदाची चाहुल हिरवी**
**वातावरणांतुनी**

**शेतें, सागर, पर्वत नटले**
**एकच हिरवेपणीं**

**स्वैर पसरली माळ दूरवर**
**तटस्थ सारें दिसे**

**अलिप्ततेनें एक पाखरूं**
**वृक्षावर गातसे !**

**नितळ नदीच्या विरल तळांतिल**
**मेघांच्या सांवल्या**

**सोनेरी मासळी उसळतां**
**क्षण विचलित जाहल्या !**

**या नगरीच्या मधुन वाहते**
**एक चिमुकली नदी**

**तीरावरचे वृक्ष वांकुनी**
**बघती पाण्यामधीं !**

**शिर उंचावुन बदक चिमुकलें**
**बघतें पाण्यांतुनी**

**'खोल तळाशीं जाउन आलों !'**
**भाव दिसे लोचनीं !**

**उंच भरारी घेउन गेली**
**दूर कुठें कोकिळा**

**दूर कुठें तरि - जिथें पाचुचा**
**रम्य बहरला मळा !**

**चेरींचा ये मोहर बघण्या**
**खेड्यामधुनी कुणी—**

**अन् नाण्यांची भरली पिशवी**
**खुळा बसे हरवुनी !**

**हिसळुनि घुसळुनि तरुराजींना**
**ओसरलें वादळ—**

**अंधुक संधिप्रकाशांतुनी**
**स्वर उरले विव्हळ !**

●●●

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

(पृष्ठ १५ वरून)

'चला' म्हटल्यावर मूढपणें तुझ्याबरोबर निघालों. वाटेंत तूं म्हणालीस, 'बाबा म्हणाले की सारं कृष्णार्पण कर; माझी आठवण ठेव; यावंसं वाटलं की ये; असा त्यांचा तुम्हांला निरोप आहे.'..... कां सांगितलंस तूं मला हें? खरोखरच स्वामीजींचा असा निरोप होता? की तूंच तुझ्या मनानं तो रचलास? कां? माझ्या मनांत जें चाललं होतं तें तुला कळलं होतं?

खरोखरच माझं मनोगत त्या वेळीं तुला कळलं असेल तर एका पापापासून आणि आत्मघातापासून मला वाचवल्याचं समाधान तुला मिळालं असेल. पण त्या प्रसंगांतून मला मागें ओढल्यानं माझी परिस्थिति कांही बदलली नाहीं. तुझ्या प्रेमानं व्याकूळ झालेलं आणि नंतर मंगलेच्या प्रेमानं फाटून गेलेलं माझं हृदय एका पोकळींत तडफडत राहिलं; उजाड आयुष्यांत अर्थ भरण्यासाठीं धडपडूं लागलं. बऱ्या-वाईटाचा विचार करायला त्या धडपडींत अवकाश नव्हता. या मनःस्थितींत असतांना गोपाळ भेटला. आज माझ्या आयुष्यांत असलेला अर्थ त्यानं निर्माण केला आहे. माझ्या आयुष्यांतला अर्थ तूं नष्ट केल्यावर त्यानं नवा अर्थ त्यांत भरून दिला. तरी तूं सात्त्विकाची भक्त गणली जातेस आणि तो दुर्गुणांचा पुतळा ठरला आहे. महालक्ष्मीच्या रेसकोर्सवर त्यानंच मला नेलं. छचोर पोरींची पावलं ओळखायला त्यानंच मला शिकवलं. जीवनांतला रस आणि रंग त्यानंच मला मिळवून दिला.

तूं दुसऱ्यांदा भेटलीस तेव्हां तो पहिल्यांदा मला एका नायकिणीच्या घरीं घेऊन जात होता. तूं वाटेंत आलीस आणि स्वामीजींनी माझ्यासाठीं दिलेली वस्तु घेण्यासाठीं चला म्हणालीस. पुन्हां मी, त्याची साथ सोडून, मूढपणें तुझ्याबरोबर गेलों. आमचा बेत तुला कळला नसेल तर पुन्हां मला आपल्याबरोबर घेऊन जाण्यांत तुझा काय हेतु होता? त्या दिवशीं स्वामीजींच्या नांवानं तूं मला दिलेलं तें विनोबांच्या 'गीता-प्रवचना'चं पुस्तक मी अजून उघडूनहि पाहिलं नाहीं.

पण तूं अशी नेमक्या वेळीं भेटतेस. आणि माझं मन आंखलेल्या बेतापासून विचलित होतं. कां होतं असं? माझ्या नियतीनं तुला माझी वाट अडवण्यासाठींच नेमलं आहे का?

पण अशी वाट अडवल्यानं कांही साधत नाहीं. व्हायचं तें होतंच. मी जर अधःपाताच्या वाटेवर असेन तर तूं वाट अडवल्यानं माझी वाटचाल थांबलेली नाहीं. अधिकाधिक गहन गर्तेत शिरत चाललों आहे मी. म्हणूनच म्हणतों, तूं माझी वाट अडवणं व्यर्थ आहे. व्हायचं आहे तें अटळ आहे. मग कशाला उगीच वाटेंत येतेस? हो माझ्या वाटेंतून दूर! तूं तुझ्या वाटेनं जा. मला माझ्या वाटेनं जाऊं दे. कदाचित या वाटेच्या शेवटीं आपणां दोघांच्याहि वाटा एकत्र येतील, आणि मग तुझी ही अपार्थिव प्रीति मला कदाचित कळेल, हवीशी वाटेल. पण जोंवर आपल्या वाटा भिन्न आहेत तोंवर तूं माझी वाट अडवायला येऊं नकोस.

कदाचित ही वाट संपण्यापूर्वीच माझा शेवट होईल. वाटेच्या कडेला कुठे तरी मी पडलेला असेन. शरीर असंख्य रोगांनीं पिडलेलं असेल. आणि त्यावर माशा घोंघावत असतील. जगांत कोणीहि माझ्यासाठीं अश्रु ढाळणारं नसेल. त्या वेळीं तूं अशीच अचानक येशील. जो योगायोग तुला आजवर माझी वाट अडवण्यासाठी पाठवीत आला आहे तो त्या वेळींहि तुला शेवटचं माझ्याकडे धाडील. आणि गतयौवना रोगजर्जर वासवदत्तेला भगवान उपगुप्तानं जसं रस्त्यावरून उचलून आपल्या करुणेच्या कवेंत घेतलं तसं, त्या वेळीं तूंहि मला आपल्या मायेच्या छायेंत नेशील. तसं झालं तर त्यांतहि मला खंत नाहीं. पण तसं होण्यापूर्वीं तूं येणं व्यर्थ आहे.

नको. अशी बघूं नकोस. माझ्या अंतरंगांत काय चाललं आहे तें सारं कळतंय तुला. ज्या योगायोगानं तुला इथें धाडलं त्यानंच माझं सारं मनोगत तुला सांगून टाकलं आहे. मी आतां तुझ्या स्वाधीन न होण्याइतका बेरड झालों आहे इतकच. पण तूं अशी भेदक नजरेनं बघत राहिलीस तर माझ्या धैर्याचा कोट ढांसळेल. बघ. माझ्या कंठाशी हुंदका येत आहे. तूं अधिक वेळ माझ्याकडे बघत राहिलीस तर तुझ्या कुशींत तोंड खुपसून रडण्याची उबळ येईल मला. पण स्वतःला मी सावरलंच पाहिजे. माझ्या डोळ्यांतले अश्रु नीलेला दिसतां कामा नये. रंगेल पांखराला कारुण्याचं वावडं असतं. मी दीन झालेला तिनं पाहणं ह्यांत मला तिचा व माझाहि अपमान वाटतो. ती बघ, नीला समोरून येत आहे. तुला वाहिलेली हीं माझ्या डोळ्यांतलीं दोन आसवं तुझ्याबरोबर घेऊन जा आणि ह्या उडत्या परीबरोबर अविकल मनानं मला रमूं दे. ●●●

**तुमच्या (वि)श्वासावर देशाचा प्राण अवलंबून आहे. तेथें तन, मन, धन व्हायचें आहे!**

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# बरस गुजर गये लेकिन मेरा टी एम् बी अब भी मजबूत है

हम दोनों ने मिलकर करीब करीब पांच लाख मील दिन और रात हरएक मौसिम में पहाड़ों को नापा–मैदानों की सैर की, और हर छोटी–मोटी डगर को पार किया। लेकिन कभी भी मेरे टीएम्बी ने मुझे धोखा नहीं दिया। जब मैं इस काम को छोड़ दूंगा तब मेरा लड़का इसी ट्रक को चलाएगा और यह ट्रक उसके और उसके परिवार के लिए सौभाग्य बन जाएगी। यह सोना है सोना। हां,

सौभाग्य लानेवाला सितारा।



टाटा
मर्सिडीज़ - बेंज़





टाटा इंजीनियरिंग एण्ड लोकोमोटिव कम्पनी लिमिटेड विक्री कार्यालय १४८, महात्मा गांधी रोड, बम्बई-१










अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट





# गणपतराव 'टॉम्बे'

## एक दिलखुलास माणूस

—गोपालकृष्ण भोबे

**माझ्या** परिचयांतली कांहीं दिलखुलास माणसें आहेत. मला तीं माणसें मनापासून आवडतात. या माणसांचें कधींहि आंतबाहेर असें वर्तन नसतें. हातचा राखून हीं माणसें वागत नाहींत. त्यांना वाईट वाटलें तर स्वच्छपणें तीं बोलून दाखवितात. चूक कबूल करायला लावतात. आपली चूक असली तर मोकळेपणानें कबूल करतात. आणि थोडयाच वेळांत कलह विसरून पूर्वीसारखी वागूं लागतात. त्यांच्या मनांत अढी राहात नाहीं. त्यांना अति काळजी नाहीं. अत्यानंद नाहीं. अति दुःख नाहीं. सारांश हीं माणसें अतिरेकी नाहींत. दुसऱ्याच्या लहानसहान गुणांबद्दल त्यांना अपार कौतुक. कोणताहि गुण असो त्याला ते भरघोस उत्तेजन देतील; आणि आपल्याकडे तो नसल्याबद्दल हळहळतील. असल्यास त्याचा विकास घडवितां न आल्याबद्दल दैवाला दोष देतील. त्यांच्या मित्रमंडळीत जशीं गुणवान माणसें असतात, तशीं धनवानही असतात; पण दोघांशींही वागण्यांत यांच्यांत समतोलपणा दिसून येईल.

या उलट माझ्या परिचयांत आणखीहि कांहीं अशीं माणसें आहेत.. ....पण शी !.....तसल्या उलटया माणसांचें विवरण या इथें कां करूं ? इथें फक्त दिलखुलास माणसाबद्दलच सागायचें आहे. आणि अशा दिलखुलास माणसांपैकीं आज ज्यांच्यासंबंधीं मी सांगणार आहें त्यांचें नांव श्री. गणपतराव तांबे. पुण्याच्या "टॉम ॲण्ड बे" या नांवाच्या जाहिरात-वितरण संस्थेचे हे मालक. तांब्यांच्या जाहिरात संस्थेला विसांवर वर्षें होत आलीं. वीस वर्षांनंतर गेल्याच महिन्यांत त्यांची संस्था एका नव्या अद्यावत जागेंत गेली. त्याप्रित्यर्थ एक समारंभ झाला. महाराष्ट्रांतील स्वनामधन्य लोकांचा एक लहानसा मेळावाच या समारंभाला जमला. गणपतरावांहून वडील असलेल्या लोकांनी गणपतरावांना तोंड भरून आशीर्वाद दिले आणि त्यांच्या समवयस्कांनी त्यांचें मनापासून अभिष्ट चिंतिलें.

जाहिरात-वितरण संस्थेचा आणि वृत्तपत्रांचा घनिष्ट संबंध असल्यामुळें बहुसंख्य वृत्तपत्रांनी गणपतरावांच्या या समारंभाचें सचित्र वृत्त दिलें. कांहीं वृत्तपत्रांनी त्यांच्या आजवरीच्या कर्तबगारीचा आढावाही घेतला. तो वाचून आनंद झाला. मला या समारंभाला इच्छा असूनही हजर राहातां आलें नाहीं, याबद्दल मनस्वी वाईट वाटलें. कारण तशा त्या समारंभांत एकदोन वेळां तरी माझी आठवण निघावी इतकी गणपतरावांची नि माझी मैत्री आहे. आणि म्हणूनच या प्रसंगीं गणपतरावांसारख्या कर्तबगारीनें भरलेल्या आयुष्याबद्दल कांहीं थोडेंतरी लिहिलेंच पाहिजे अशी मनाला रुखरुख लागली. गणपतरावांची ही मुलाखत नाहीं; किंवा ऋणानुबंधाला दिलेला हा अहेरहि नाहीं. त्यांच्या सौम्य आणि अकृत्रिम वागणुकीचा हा गुणगौरव आहे. आणि तोहि मर्यादा राखून ..घांवता व त्रोटक !

एकाद्या माणसाची परीक्षा आणि त्याचें सामाजिक स्थान त्याच्या मित्रमंडळीवरून अजमावावें अशी एक व्याख्या पूर्वीच्या लोकांनी करून ठेवलेली आहे. गणपतराव तांब्यांच्या मित्रमंडळींत पुरुषार्थ साधलेली माणसें सदैव दिसतात. हीं माणसें ख्यातनाम आहेत.







अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

चरित्रवान आहेत. अतिशय बिकट परिस्थितींतून दिवस काढून सततोद्योगानें–आज कित्येक प्रचंड विडी कारखान्यांचे मालक असलेले 'वस्तीराम नारायणदास माहेश्री' उद्योगसमूहाचे एक आधारस्तंभ श्री. रामनाथ शेठ चांडक; रेल्वेच्या स्थानकावर झोंपून, चित्रकलेचें शिक्षण स्वतःच्या कष्टांनी पुरें करून–आज रॅशनल आर्ट सर्व्हिसेस-सारख्या मान्यवर संस्थेचे चालक व मालक चित्रकार जयंत-राव देवकुळे, ख्यातनाम चित्रकार व संपादक श्री. दीनानाथ दलाल, आंतरराष्ट्रीय ख्यातीचे छायाचित्रकार श्री. रायू प्रभू, श्रीकृष्ण देवकुळे, चित्रकार आपटे, चार्टर्ड अकौंटंट श्री. अण्णासाहेब कोल्हटकर प्रभृति माणसें गणपतरावांच्या अंवतीं भंवतीं कोणत्याही प्रसंगीं छायेसारखीं असतात.

असा असामान्य मित्रपरिवार लाभणें हें एक प्रकारचें भाग्यच होय. गणपतराव तांब्यांना तो लाभला याचें कारण त्यांची दिल-खुलास आणि प्रामाणिक वृत्ति. त्यांच्या स्वभावांत ढोंग नाहीं. गरिबीबद्दल फारसा खिन्नपणा नाहीं. वैभवाचा माज नाहीं. सर्व-बाबतींत समतोलपणा. माझ्या परिचयांतल्या या अशा कांहीं माण-सांना हें तोल राखण्याचें प्रकरण कसें काय जमतें याबद्दल मला सदैव आश्चर्य वाटतें. गुणाइतकेंच ठसठशीत दुर्गुण असलेल्या माणसां-शींहि यांचें छान जमतें. त्यांच्या दुर्गुणांना खड्यासारखे बाजूला ठेवून हे त्यांचे घनिष्ट मित्र बनूं शकतात. मला मात्र तें कधींच जमत नाहीं. ती एक साधना असावी का ? ती साधायला कोणत्या मार्गानें जावें याबद्दल मात्र माझें मन कुढत राहातें.

गणपतरावांचा आणि माझा परिचय चित्रकार दलालांकडे झाला. या गोष्टीला आज कित्येक वर्षें झालीं. परिचय झाला; लोभहि वाढला. आजपर्यंत तो एकाच धारेवर आहे. कोणत्याहि परिस्थि-तींत त्यांत बदल झालेला नाहीं. श्री. दलालांच्याबरोबर अनेक वेळां मी गणपतरावांचा पाहुणचार घेतलेला आहे. व्यवहारांत गणपतराव सुटाबुटांत वावरत असले तरी त्यांचें मन वर्णाश्रम-धर्मानें सांगितलेलीं तत्त्वें पाळण्यांत व्यग्र असतें. प्रत्यक्षांत मी तें पाहिलें आहे. एका रविवारी सायंकाळीं फिरायला म्हणून आम्हीं बाहेर पडलो, आणि गणपतरावांनी आपली गाडी चतुःश्रृंगीच्या बाजूला वळविली. थोड्याचवेळांत आम्ही तिथें पोहोचलो देखील.

सायंकाळचा सहा साडेसहाचा सुमार. उन्हें मावळलीं होतीं; पण चतुःश्रृंगीच्या देवळाच्या पायथ्याशीं जिथें आम्हीं गप्पा मारीत बसलों होतों तिथून जमिनींतून गरम वाफारे निघत होते. आसपास कुणी चिटपाखरूं नव्हतें. साऱ्या वातारणांत निरव शांतता होती. थोड्या वेळानें गणपतरावच म्हणाले–"चला आलों तसे देवीचें दर्शन घेऊनच जाऊं !" आम्ही उठलों. देवळाच्या पायऱ्या चढूं लागलों. मी थोडासा पुढें जाऊन दोन दोन पायऱ्या चढून सर्वांच्या आधीं देवळाच्या प्राकाराच्या महाद्वाराजवळ थबकलों. उंबरठ्याच्या आंतमध्यें पाऊल टाकायला मी उजवा पाय उचलला मात्र काळें कभीन्न आणि बरेंच लांब असें एक सरपटतें जनावर दृष्टीसमोर सळसळलें. सर्वांगावर सरकन कांटा उभा राहिला. काळजांतल्या धडकीनें गात्रें थरथरलीं, मी तसाच वेगानें मागें फिरलों. धडाधड दोन दोन पायऱ्या उतरलों. आणि ओरडलों "बापरे!" गणपतराव, दलाल, अण्णासाहेब देशमुख वगैरेंना मी जे पाहिलें तें धडधडत्या अंतःकरणानें सांगितलें. 'मी तर नाहींच; पण तुम्हींहि आंतमध्यें जाऊं नये' अशी विनंतीहि केली. इतक्यांत त्या परिसरांत राहाणारी एक सेवेकरी बाई आली. आमची कुजबुज तिच्या कानांनी टिपली. बाई म्हणाली "बाबा, तुम्हांला देवाचं खरं दर्शन झालं. तें दर्शन हवं म्हटल्यानंहि होत नाहीं. तुम्ही भाग्यवान!" झालें. तिच्या त्या शब्दांनी गणपतरावांचा भक्तिभाव जागृत झाला आणि या घटनेंत कांहींतरी साक्षात्कार असावा या भावनेनें त्यांनी देवळांत जायचा निश्चय केला. शिवाय आम्हां सगळयांना घेऊनहि त्यांनी मंदिर-प्रवेश केलाच. त्यांनी देवीच्या गाभाऱ्याभोंवतीं प्रदक्षिणा घातल्या काय, तिथल्या भटजीला सांगून गाऱ्हाणें घालायला लावलें काय; दहा पंधरा मिनिटें ते आराधना करीत होते; पण माझें घाबरलेलें मन मात्र केव्हां एकदा याचें हें सर्व आटोपतें याची वाट पाहात होतें. माझ्या डोळयांसमोर फक्त मघां पाहिलेली सळसळणारी काळी आकृति होती. ती अधि-काधिक मोठी होत जात होती; पण परत येतांना मात्र गणपतराव सारखे म्हणत होते–'भोवे, तुम्हांला मात्र साक्षात्कार झाला बरं काय; तुमची कांहीं तरी पुण्याई असली पाहिजे !" पण माझी परिस्थिति फक्त मीच जाणत होतों. मला सारखें वाटत होतें–चतुः-श्रृंगीच्या पायथ्याशीं आम्ही मोटार ठेवून गेलों; चांगला पाऊण तास देवकार्यांत घालवला; त्या अवधींत गाडींत 'तसलें' कांहीं शिरलें नसेल ना ! मी गणपतरावांना त्यांच्या लक्षांत न येईल अशा रीतीनें वेगळया अंगानें प्रश्न केला–"काहो गणपतराव, तुमची ही नव्या पद्धतीची गाडी तळाला पॅकबंद असते का?" "कां ?" "नाहीं म्हटलं पावसाच्या पाण्यानं रस्ते भरले तर बैठकीपर्यंत पाण्याचा संपर्क पोहोंचत नाहीं ना?" गणपतराव "छे ! छे ? " म्हणाले, पण दलालांना माझ्या प्रश्नांची खोंच कळली आणि ते खो खो हंसायला लागले.

* * *

जीवनाच्या रूळलेल्या चाकोरीबाहेर जाऊन आयुष्याची कसोटी पाहणारा वेगळा व्यवसाय गणपतरावांनी सुरू केला तेव्हां आप्तांनी त्यांना वेड्यांत काढलें ही गोष्ट तत्कालाला रास्तच होती. आंग्ल-विद्या विभूषित होऊन झटपट मिळणारें व्यावहारिक यश सोडून यशाची दीर्घकाळ वाट पाहायला लावणारा असला काल्पनिक खेळ वरिष्ठांना पसंत पडणें शक्यच नव्हतें. पण गणपतरावांच्या डोळयां-समोर वेगळीं ध्येयें होतीं. वेगळया कल्पना होत्या. या बुद्धिवान, कलात्मक, कल्पक तरुणाची विचारसरणी ठराविकाहून वेगळी होती.

जुन्या पिढीनें ज्यांना उडाणटप्पूपणा म्हणावें पण ज्यांत गणपतरावांच्या भावी यशाची मुहूर्तमेढ रोंवली जात होती अशा गोष्टी त्यांच्या हातून अजाणतेपणें घडत गेल्या. अभ्यास सोडून त्यांनी मासिकें चालवीत बसावें. इंग्रजी चित्रपटांची परिक्षणें आणि नटयांची बिनचूक माहिती असलेलें लिखाण सफाईदार इंग्रजींत करून कॉलेज तरुणांत आपलें मासिक लोकप्रिय करावें. नाटकांत कामें करावीं. नाटक्यांच्या संगतींत वेळ काढावा. असल्या बाह्य




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

उच्चापतीमुळें एकदोन वेळां त्यांना नापास होण्याचे प्रसंग आले; आणि घरची मदतहि वंद व्हायची धमकी आली; परंतु इथून खरी गणपतरावांच्या स्वतंत्र आयुष्याला सुरुवात झाली. एका जाहिरात कंपनीकडे त्यांनी उमेदवार म्हणून काम केलें आणि आपल्या स्वभावाला रुचेल पचेल अशा धंद्याची गुरुकिल्ली गणपतरावांना सांपडली.

१९३७ च्या सुमारास त्यांनी स्वतःची 'मेट्रो पब्लिसिटी सर्व्हिस' नांवाची संस्था स्थापन केली. मोठ्या हिंमतीनें संस्था स्थापन केली खरी पण स्वतंत्र व्यवसाय म्हटल्यानंतर येणाऱ्या अडचणींना तोंड देतां देतां अनेक वेळां गणपतरावांचे पाय लटपटले. 'मेट्रोपब्लिसिटी' हें नांव देतानां अजाणतेपणें त्यांनी 'मेट्रो' नांवाच्या ख्यातनाम सिनेमा कपनीचे वोधचिन्हहि वापरलें. त्यामुळें कालांतरानें प्रसंग भलताच ओढवला. मेट्रो कंपनीनें वोध्दचिन्हांच्या कायद्याचा भंग केल्याची सणसणीत नोटीस पाठवली. हें प्रकरण निस्तारतां निस्तारतां नाकी नव आले. मेट्रो हें नांव पुसून त्या जागी 'लिओ' नांव घातलें. मेट्रोला दिलेलें माफीपत्र वृत्तपत्रांतून छापून आलें. त्याचा वोलवाला विरतो न विरतो तो 'लिओ' नांवाच्या मूळ कंपनीकडून नांवाच्या वावतींत फसवणूक करण्याची दुसरी नोटीस आली.

नामकरणाच्या वावतींतल्या या दोन्हीं गोष्टी निस्तारल्या खऱ्या पण दोन्हीं घटनांमुळें गणपतरावांचें मात्र वरेंच नांव झालें. त्या नांवामुळें त्यांना एक चांगली नोकरीहि मिळाली. या नोकरींत गणपतराव तांव्यांना विविध तऱ्हेचे अनुभव मिळाले. नोकरी त्यांनी फक्त पांच वर्षे केली; पण असंख्य अनुभवांच्या गोष्टी पदरीं गोळा झाल्या. १९४५ सालीं पुन्हां स्वतंत्र व्यवसाय करायची कल्पना त्यांच्या डोक्यांत आली. या कल्पनेनें त्यांना अस्वस्थ केलें. या अस्वस्थतेंतून अचानकपणें त्यांना आपल्या कंपनीचें नांव सुचलें. आपल्या तांवे नांवाचें त्यांनी झक्कपैकीं इंग्रजीकरण केलें. 'टॉम अ‍ॅण्ड वे' एक शुभ मुहूर्त पाहिला आणि सुप्रसिद्ध कादंवरीकार पद्मश्री ना.सी. फडके यांच्या हस्तें या संस्थेचा उद्‌घाटन समारंभ १५ जून १९४५ रोजी त्यांनी करून टाकला.

गेल्या वीस वर्षांत 'टॉम अ‍ॅण्ड वे' या संस्थेच्या आयुष्यांत उन-सावलीचे अनेक प्रसंग उद्‌भवले. जीवन मरणाचेहि प्रसंग उभे राहिले; पण या सर्वांना गणपतरावांनी धैर्यानें तोंड देऊन संस्था नांवारूपाला आणली. ग्रहदशा सुधारली कीं माणसें देखील अशीं मिळूं लागतात, कीं त्यांचा आश्रय म्हणजे जन्माचें कल्याण होतें. गणपतरावांना १९५२ पासून अशीं माणसें मिळूं लागलीं. किर्लोस्कर उद्योग समूहाचे अध्वर्यु शंतनुराव किर्लोस्कर हें 'टॉम अ‍ॅण्ड वे'चे एक फार मोठे आधारस्तंभ. स्वस्तिकचे श्री. वसंतराव व श्री. दादासाहेव वैद्य,वस्तीराम नारायणदास माहेश्रीचे श्री. रामनाथ शेठ, श्री. वावू शेठ, अशा व्यक्तींचें तर पाठवतहळ ह्यात.गणपतरावांच्या सौम्य,आणि अकृत्रिम वागणुकीनें त्यांच्या 'टॉम अ‍ॅण्ड वे' ला असे कित्येक आधारस्तंभ लाभलेले आहेत.

गेली पंचविसांवर वर्षे या जाहिरात धंद्यांत रूळल्यामुळें त्यांच्या अभिव्यक्तींत झोंकदार सफाई आणि स्वभावांत डौलदार गोडवा आलेला आहे. त्यामुळें अनेक प्रथितयश माणसें गणपतरावांच्या भोंवतीं गोळा झालेली आहेत. या वहुतांचीं अंतरें गणपतराव सहजगत्या राखूं शकतात. तारतम्य, दूरदृष्टि, धाडस आणि कल्पकता हे गुण त्यांच्या अंगांत भरपूर प्रमाणांत आहेत. त्यामुळें आपल्या 'टॉम अ‍ॅण्ड वे'या संस्थेचा रौप्य महोत्सव ते स्वतःच्या इमारतींत साजरा करतील यांत संशय वाटत नाहीं.

गणपतराव नादलुब्ध आहेत. क्रीडाप्रेमी आहेत. काव्य, नाटच, वाङ्‌मयाचे रसिक भोक्ते आहेत; परंतु त्यांचें क्रीडाप्रेम आणि नाद-लुब्धता हे दोन गुण माझ्या विशेप नजरेंत भरतात. कांहीं कामा-निमित्त मुंवईत आले कीं त्यांचा मुक्काम विशेपेकरून दलालांकडे असतो. दलालांच्या 'दिपावली'चे ते सुरुवातीपासून सहकारी. दलालांच्या कचेरीत ते वोलत वसलेले असतात. वाजूलाच मी कांहीं तरी कामांत व्यग्र असतों. ऊर्मि आली कीं, मोठ्यानें गुणगुणायची माझी संवय आहे. मग स्थलकालाचें भान मला राहात नाहीं. एखादी चीज किंवा जुन्या नाटकांतील एकादें वजनदार चालीचें पद मी गुणगुणत असतांना गणपतराव तिथें असले, कीं ते आपला वोलण्यांतला विपय—तो कितीहि महत्त्वाचा असला तरी—विसरतात. त्यांचें लक्ष सारखें त्या पदाकडे असतें. मागाहून सतरा वेळां माझ्या-कडून त्या पदाची चाल म्हणवून घेऊन आपल्या गळ्यावर चढल्या-सारखी ती वाटली, कीं ते मार्गस्थ होतात. पुढें महिन्या दोन महि-न्यानें गांठ पडली, कीं म्हणतील—"भोवे, त्या दिवशीं दलालांच्या स्टुडिओंत कोणतं पद शिकून घेतलं हो मी ? तिथून फोर्टमध्यें गेलों आणि दुसऱ्या कामांत गुंतलों असतांना विसरूनच गेलों. गाडींत शंभरवेळां आठवायचा प्रयत्न केला पण च्यायला आठवेचना!" मग मी त्यांना चाल सांगतों. आणि एकदम कांहींतरी गवसल्यासारखा प्रसन्न चेहरा करून तांवे म्हणतील—"हें असं आहे च्यायला ? हें ज्याचं त्याला............!"

गणपतरावांना नाटकांत भूमिका करायच्या होत्या. 'हिरो' व्हायचें होतें. पूर्वाश्रमात तसे थोडेसे ते नाटकांत नाचलेलेहि आहेत; परंतु त्यांच्यांतला नट आतां पूर्णपणें मावळलेला आहे. ती त्यांची सुटत असलेली भावना कधीं कधीं हुरहुरते. मग काल्पनिकपणें तें 'थैयंवर' होतात; 'आश्विनशेठ' होतात. 'चारुदत्त' होतात. आणि मग जोर-जोरानें (कारण आतां घावरायचें कांहीं कारण नाहीं.) एका मागून एक पदें स्रवूं लागतात "माता दिसली...?" "हा नाद सोड सोड...?" कांहीं नटांच्या नकलाहि हें सारें करीत असतांना ते करतात. आणि तो कैफ ओसरून गेला, कीं पुन्हां व्यवहार चालू होतो.

त्यांच्या संगीत प्रेमांत त्यांचें माझें जेवढें जमतें तसें त्यांच्या क्रीडाप्रेमांत जमत नाहीं. त्यांच्या क्रीडा प्रेमाचे साथीदार दलाल. वेस्ट इंडिज्च्या किंवा इंग्लंडमधल्या एखाद्या परगण्यांतल्या मैदानांत कुठें क्रिकेटचा सामना चालू असला तर तिथल्या खेळाडूनें हाणलेल्या प्रत्येक टोल्याला हे इथें उड्या मारतील. मुंबईत किंवा पुण्यांत कसोटी सामना असला, कीं मग विचारायलाच नको. भांगेच्या तारेसारखी ही धुंदी असते. खरें क्रिकेट हे दोघेच खेळत असतात असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति वाटूं नये.

गणपतराव आणि मी पुष्कळ वेळां एकत्र आलेलों आहोंत. आम्हीं एकत्र प्रवास केलेला आहे. एका ठिकाणी राहिलेलों आहोंत. अशा वेळी त्यांचा मायाळु आणि काळजीवाहू स्वभावाची मला पूर्ण

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कल्पना आलेली आहे. एकदां पुण्याहून सिन्नरला जातांना नारायणगांवला चुरमुऱ्यांचा तिखट चिवडा खाऊन त्यावर मी अजाणतेपणें पाणी प्यायलों. आणि त्याचा परिणाम मला भोगावा लागला. त्यावेळीं गणपतरावांच्या चेहऱ्यावर दाटलेली काळजी आणि काहूर मी कधींहि विसरणार नाहीं. एक मात्र खरें, कीं परक्या स्थळीं गणपतरावांच्या बरोबर गेल्यानंतर त्यांच्यातला मित्र बाजूला होतो आणि पिता जागा होतो.

पन्नाशी गणपतरावांनीं ओलांडली असावी; किंवा नसावीहि. सुना आणि जांवई यायच्या उंबरठ्यावर ते आलेले आहेत. हां हां म्हणतां हें सर्व घडून येऊन सृष्टिक्रमाप्रमाणें त्यांच्या मांडीवर नातवंडेंहि खेळूं लागतील. हें सारें येत्या चार पांच वर्षांत घडेलहि; पण येत्या चारपांच वर्षांत हें सारें घडेल असें मानलें तरी आजोबा म्हणवून घेण्याची छाया अजून त्यांच्यावर पडलेली नाहीं. आजची त्यांची उमेदी–पस्तिशींतल्या सारखी–प्रकृति पाहिली तरी आणखी पंधरा वर्षे तरी तसें वाटत नाहीं. त्यांच्या दिलखुलास वृत्तीनें त्यांना तसें ठेवलेलें आहे. (श्री. दलाल, श्री. जयंतराव देवकुळे यांनी तर चाळीसी ओलांडली असेल असें देखील वाटत नाहीं. त्यांना यौवनाचें वरदानच आहे. असो विचारे!) निर्दंभ आणि निर्व्याज प्रेमानें गणपतरावांनीं आज असामान्य मित्रपरिवार आणि जिवाभावाचे सहकारी मिळविलेले आहेत. त्यांचे तें भाग्य तसेंच राहो आणि त्यांची संस्था उत्तरोत्तर भरभराटीला येऊन स्वतःच्या इमारतींत जाण्यांचा सोनियाचा दिवस पाहो अशी याप्रसंगी इच्छा व्यक्त करतों! ●●●

(पृष्ठ १० वरून)

रशियाला वाटली नाहीं. उलट भारत अमेरिकेच्या शस्त्रास्त्र करारांत सामील झाले असते तर काश्मिरांत अमेरिकन युद्ध-तळ आला असता मग रशिया व चीन यांची एकजूट मक्कम झाली असती, आशियांत युद्धाचा धोका वाढला असता. अँग्लो फ्रेंच अमेरिकन्स यांनीं रणांगणांत कच खाल्ली असती (हें कोरिया व इंडोचीन येथें सिद्ध झाले आहे.) आणि लाओस व दक्षिण व्हिएतनाम येथें जशी कम्युनिस्ट क्रांति मडकत आहे तशी भारतासुद्धां साऱ्या आशियाभर मडकत राहिली असती. अॅटमबाँबचें युद्ध झालें असतें तर अॅटमबाँबनें लोकशाही स्थापन करतां येत नाहीं, फक्त विध्वंस करता येतो व फक्त कम्युनिझम माजवितां येतो एवढेंच ठरलें असतें.

अमेरिकेचें साहाय्य घ्यायला हवें होतें म्हटले तरी अमेरिकेनें भारताशी सख्य कितीसें ठेवलें? पाकिस्तानला कोणीही कम्युनिस्ट शत्रु नसता व पाकिस्तान भारतावर सतत शस्त्र प्रहार करीत असता अमेरिका पाकिस्तानला शस्त्रें पुरवित राहिली. पण अमेरिकेचा यांतला हेतु इतका स्पष्ट आहे की, भारत समर्थ व्हावा अशी इच्छा अमेरिकेची नव्हती व नाही एवढेच येथे केव्हांही अनुमान निघतें. आणि रशियाची मात्र भारत समर्थ व्हावा अशी इच्छा आतां खास आहे.

वरील सर्व विवेचन समजून घेतलें तर एक गोष्ट लक्षांत येईल की, हिमालयावरील चीननें आक्रमण हा गेल्या पंधरा वर्षांतला कमीत कमी अनर्थ होय. नेहरूंचें धोरण थोडेही वेगळें असतें तर भारताला फारच मोठा अनर्थ सोसावा लागला असता. माझ्या मतें परराष्ट्र धोरणांत नेहरूंची मुत्सद्देगिरी सर्वत्र यशस्वी झाली आहे. शिवाय त्यांचीं धोरणें नुसती मुत्सद्देगिरीचीं नसून तीं धार्मिक निर्वैरत्वावरच व मित्रभावावर आधारलीं होतीं हा नेहरूंचा विशेष गुण होय. 'अद्वेष्टा सर्वभूतानाम् मैत्रः करुण एवच" या गीतेतील भगवद्भक्ताच्या कसोटीस नेहरू संपूर्ण उतरले व व्यवहारांतही यशस्वी झाले ही त्यांची अद्वितीय थोरवी होय.

नेहरूंच्या अंतर्गत धोरणासंबंधानें मी येथें फारसे लिहीत नाहीं. जीवनावश्यक वस्तूंची अफाट वाढ झाली तरी त्यांचा तुटवडा पडला हें लोकसंख्या ज्या वेगानें वाढत आली त्यावरून पाहता काहीसे अपरिहार्य दिसते. लोकशाही मार्गानें एवढ्या अफाट व मागसलेल्या देशाचा विकास करण्याचा भारतांतला नेहरूंचा प्रयत्न हा जगांत पहिलाच असून सगळे पुढारी व लोक यावावत नवखे व सर्व साहित्याची टंचाई अशा परिस्थितींत हा विकास सुरू झाला. कॉंग्रेसमध्यें अनीति फार आहे, पण देशांत सर्वत्र जी नीती-अनीति आहे तीच कॉंग्रेसमध्यें आहे. नेहरूंना कडक व्रताचा नीतिनिष्ठ पक्ष उभारता आला नाहीं हें खरें. पण असा पक्ष अथवा पंथ उभारला कीं, त्यांत हुकूमशाही, गुंडगिरी, अनीति माजते असा अनुभव फॅसिस्ट, नाझी, कम्युनिस्ट वगैरे पक्षांवावत व साधुसंतांचे मठ, महंत, शिष्य याववत आला असल्यानें कडक शिस्तीचा मोठा पक्ष स्थापणें नेहरूंना पसंत नव्हते असेंच वाटते. लोक चुका करीत करीत अनुभव घेत घेत शहाणे होतात, लोकांना भरपूर संधी द्यावी, चळवळीसाठीं स्वातंत्र्य द्यावें आणि पायाभूत असे उद्योग, पायाभूत असें शिक्षण व मार्गदर्शन आणि परिस्थितीच्या तगाधाची जाणीव एवढ्या गोष्टी लोकांना द्याव्या. पुढील मार्ग लोकांचा लोकांनी शोधायचा आहे ही नेहरूंची श्रद्धा होती.

हा लोकशाहीचा पाया घालण्यासाठीं नेहरूंनी गेली चाळीस वर्षे जीवापाड परिश्रम केले व लोकांवर मनापासून प्रेम करून अत्यंत निर्वैर व सहनशील असें चरित्र अवघड परिस्थितीत जगून दाखविलें, म्हणून असंख्य जनतेनें त्यांच्यावर प्रेम केलें. पण महाराष्ट्रांत तरी विचारी म्हणविणाऱ्या सुशिक्षितांनीं त्यांचा धिक्कार व तिरस्कार इतका केला आहे कीं, जनतेच्या भोळ्या प्रेमामुळें मी नेहरूंना थोर म्हणण्यास तयार नाहीं. नेहरूंची थोरवी अभ्यासपूर्वक विचार केल्यास कशी पटते हे मी वर दाखविले आहे. सुशिक्षितांनी भोळे प्रेम नेहरूंवर न करतां अथवा त्यांचा अविचारी विद्वेष व तिरस्कार न करता नेहरूंचें जीवन अभ्यासपूर्वक समजून घ्यावें. कारण नेहरूंची शिकवण जगाला आणखी पन्नास वर्षे तरी हवी आहे. ती विवेचकतेनें भावी पिढीला पटली तरच तिचा उपयोग आहे. भोळें प्रेम अथवा हेकट द्वेष ही दोन्ही अल्पकालांत विसरली जातील अथवा दीर्घकाल टिकली तर अपायकारक ठरतील. शेवटी लोकनेता, राज्यकर्ता व माणूस या विविध नात्यानें नेहरूंची योग्यता कोणती हें सांगण्याचें मी येथवर टाळलें ते आतां प्रांजळपणें करतो. लोकनेता व राज्यकर्ता या नात्याने नेहरू मोठेसे थोर योग्यतेचे ठरले नाहींत, त्यांच्या स्वतःच्या अंगीं कर्तव्यनिष्ठा, वक्तशीरपणा, संयम हे गुण श्रेष्ठ प्रमाणांत होते, पण ज्या लोकांवर नेहरूंचें अफाट वजन होतें त्या लोकांना त्यांनी ही शिस्त लावली नाही इतकेच नव्हे तर या शिस्तीची गरज लोकांना पटविण्याचा कधी प्रयत्नही केला नाहीं. यामुळें, नेहरू लोकप्रिय झाले तरी लोक गदळच राहिले आणि व्यक्तिस्वातंत्र्याचें फाजील स्तोम माजवून लोकांच्या गदळपणाचे नेहरूंनी लाड



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

केले. अशा या गदळ जनतेने नेहरूंवर प्रेम केले याचे कौतुक मला वाटले नाही म्हणून कालिदासाचा या लेखाच्या आरंभीचा श्लोक वापरून नेहरूंचा गौरव मी करू शकत नाहीं.

राज्यकर्ता या नात्याने नेहरू अधिकच नालायक ठरले. दिल्लीची नेहरूंभोवतालची नोकरशाही ही मोंगलाई आहे. खुशामत्यांचें स्तोम नेहरूंनी माजविले, अनेक चांगलीं कामें वाईट माणसांचे हातीं दिलीं, नालायकांना व अप्रामाणिकांना पाठीशी घातले हे सर्व अत्यंत अक्षम्य प्रमाणात घडले आणि नेहरूंची ही उणीव भरून काढणारा माणूस त्यांच्या हयातींत निर्माण झाला नाही, कदाचित पाटील म्हणतात त्याप्रमाणे या वटवृक्षाखाली निर्माण होऊं शकला नाहीं.

नेहरूंचे सारे यश 'माणूस' या नात्याचे आहे, वैयक्तिक आहे. लहान मुलाशी व सामान्य जनतेशी ज्या निर्वैरत्वाने व स्नेहभावाने नेहरू वागले त्याच निर्वैरत्वानें व स्नेहभावानें जगांतील जनतेशीं ते वागले. ज्या विदेशी राज्यकर्त्यांनीं नेहरूंशीं उघड वैर अथवा प्रच्छन्न वैर केलें त्यांच्याशीही वैर न करता त्यांच्या जनतेवर प्रेम केले, मानवजातीला व भारतालाही युद्धापासून वांचविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. तो यशस्वीही झाला. सहजीवन व सहकार्य हें तत्वज्ञान त्यांनी मुत्सद्दीगिरीने नव्हे तर बुद्धाच्या निष्ठेनें जगाला शिकविले आणि क्षितिजाखालचें पाहण्याची अलौकिक दृष्टि त्यांना इतिहासाभ्यासानें लाभल्यानें उच्चधार्मिक भूमिकेनें त्यांनी जी धोरणें आंखलीं ती मुत्सद्देगिरी म्हणूनही यशस्वी झाली. हें यश अंतर्भूत व्यवहारांत व परराष्ट्र व्यहारांतही त्यांना आलें.

नेहरू हे एक धार्मिक माणूस म्हणून यशस्वी झाले व श्रेष्ठ माणुसकीचा हा आदर्श त्यांनी जगापुढें ठेवला आहे. ते कोणत्याच धर्माचे उपासक नसता "नेहरू हे सर्वश्रेष्ठ धार्मिक गृहस्थ होते" असे राजाजींनी म्हटले आहे ते यथार्थ आहे. पण अफाट लोकप्रियता पावलेला हा माणूस राज्यकर्ता व लोकनेता या नात्यानें यशस्वी झाला नाहीं असे नमूद करतांना मला फार खेद वाटतो. ●●●




## दोर कापून टाकले आहेत–

'**दीपावली**'चा गेला अंक आपल्या हातीं देतांना पुढील अनर्थाची यत्किंचितहि कल्पना मला नव्हती. कुणालाच नव्हती. आतां बाहेर येणाऱ्या वातम्यांवरून असें वाटतें कीं, कदाचित पंडितजींना स्वतःला मात्र त्याची थोडीफार कल्पना असावी. "सारे कागदपत्र पाहून त्या संबंधांतली सर्व कृति करून झाली आहे" असें त्यांनींच लिहून ठेवलें होतें. मुंबईला कॉंग्रेसच्या अधिवेशनाला पंडितजी आले. तेव्हां ही त्यांची अखेरची मुंबई-भेट असें कुणाला वाटलें नाहीं. त्यानंतर हवापालटण्यासाठीं ते गेले आणि विश्रांति घेऊन परतले तेंच मुळीं चिर-विश्रांति घेण्यासाठीं ! पंडितजी गेले. 'जवाहरलाल मोतीलाल नेहरू' नामक शरीरांत वास करणारा अंनतात्मा पंचत्वांत विलीन झाला. उत्पत्ती, स्थिति आणि लय या चक्रनेमिक्रमानुसार हें घडलें. तें अपरिहार्य होतें. माणसाला मृत्यु हा अटळ आहे. जें जें जन्मलें तें तें क्षणाक्षणानें मृत्यूच्या जवळ जात असतें. जन्मल्या क्षणापासूनच मुळीं मृत्यूच्या मार्गावरचा माणसाचा प्रवास सुरू होतो. 'वाढदिवस कसले साजरे करतां ? एक वर्षानें आयुष्य कमी झालें. एक वर्षानें तुम्ही मृत्यूच्या जवळ गेलांत, असे म्हणणारे लोक 'निराशावादी' असले तरी त्यांत ते एक सत्यच सांगत असतात असें वाटत नाहीं काय ! पंडितजींचा मृत्यु हा अपरिहार्य होता. नेपोलियनची माती, शिकंदराची माती, शिवाजीची माती तशीच नेहरूंचीही अखेर माती झाली. जी माती होती ती मातींत मिसळून गेली. जें विनाशी होतें तें विनाश पावलें. जें संपूनच जाणार होतें तें "२७ मे १९६४" ह्या दिवसाचा शिक्का कपाळावर मारून घेऊन संपून गेलें. जें संपून गेलें त्याचा खेद करणें ही मानवी प्रवृत्ति व प्रकृति ! उतू गेलेल्या दुधावद्दल सुद्धां हळहळणारीं आपण माणसें ! मग मृत्यूनें उचलून नेलेल्या लाडक्या माणसावद्दल हळहळ वाटावी यांत काय आश्चर्य ? तशीच वेदना गेल्या महिन्यांत अनंतरूपानें व्यक्त झाली ! अखेर पंडितजी गेले. कायमचे सोडून गेले हेंच सत्य आतां शिल्लक उरलें आहे. आणि आपण आतां शांत मनानें तें स्वीकारलें पाहिजे. तें स्वीकारण्यासाठीं आवश्यक असलेली मनाची तयारी आपण आतां केली पाहिजे. पंडितजी मोठे होते, गुणी होते. जनतेचे लाडके होते, जनतेला प्रेरणा देण्याची शक्ति त्यांच्यांत होती. जगांत युद्धें होऊं नयेत. शांतता नांदावी. माणसांनीं एकमेकांना शांतपणें जगूं द्यावें. जगण्यास मदत करावी अशी श्रेष्ठ धारणा त्यांच्याजवळ होती. ते रसिक होते. स्वप्नाळू होते. फुलामुलांत रमणारे कवि होते. राजकारणांत त्यांनीं आयुष्य घालवले असलें तरी "राजकारणी–" सुतकीपणा त्यांनीं कधीं जवळही फिरकूं दिला नाहीं. हें सारें खरें असें तरी अखेर हें सारें आतां संपलें आहे. कालचें 'सत्य' आतां 'इतिहास'जमा झालें आहे. ही वस्तुस्थिति आपण सार्‍यांनीं आतां स्वीकारलीच पाहिजे. पंडितजींच्या मृत्यूनें आपल्या देशाच्या राजकारणांत एक फार मोठी पोकळी निर्माण झाली आहे ही स्थिति खरी असली तरी जगाच्या इतिहासांत महापुरुषांचा मृत्यु असा वारंवार घडत आला आहे. आणि तरीही जग पुढेंच जात आलें आहे. माणसाच्या व मानववंशाच्या जिवंतपणाचेंच तें निदर्शक मानलें जातें. ह्या देशांतही




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

हें वारंवार घडत आलें आहे. रामकृष्णांपासून हेंच चालत आलें आहे. इतिहासानें हेंच सत्य आपल्याला शिकविलें आहे. महापुरुष घडविणारा समाज असले आघात झेलूं शकतो— पेलूं शकतो— पचवूंही शकतो. ह्या समाजानें ही कसोटी वारंवार दिली आहे. आणि ह्या समाजपुरुषाच्या धमन्यांतून वाहणारें रक्त जर जिवंत असेल, तर हाही आघात तो पचविल्याशिवाय राहणार नाहीं. नेता पडल्यानंतर पळून जाण्याची आत्मघातकी परंपरा स्वराज्याला मानवण्यासारखी नाहीं. संभाजीच्या वधानंतर महाराष्ट्रानें परकी सत्तेशीं जो सामना दिला तो काय पहिल्या दर्जाचे पुढारी घेऊन ? जगण्याची जिद्द मोठी लागते आणि आमच्या भूमीचें स्तन्य अशी मोठी जिद्द देण्यास समर्थ आहे.

हा विश्वासच आपल्याला योग्य मार्गदर्शन करील. पंडितजींच्या मृत्यूनें संताजी धनाजींची जबाबदारी वाढली आहे. प्रसंगानें माणसांची कसोटी लागते. तशीच कसोटी आमचीं माणसें कितपत देऊं शकतात तें काल ठरवील. परवां पंडितजींच्या मृत्यूनिमित्त दोन दिवस सार्वत्रिक सुट्या देण्यांत आल्या. अस्थिविसर्जन प्रसंगींही सुटी देण्यांत आली. परंतु एक महाशय म्हणाले "येवढे मोठे पंडितजी गेले आणि दोनच दिवस सुटी ?" "महाशय, पंडितजींचा संदेश होता" "आराम हराम है" ! पंडितजींच्या मागें सामुदायिक नेतृत्वाचें नवें पर्व सुरू होत आहे. सार्‍यांनींच आतां 'मार्क टाइम्' करीत राहिलें पाहिजे.

दोर केव्हांच कापून टाकले आहेत !

# नेहरूनंतर कोण ?

**पंडितजी** जिवंत असतांना ह्या प्रश्नाचें उत्तर शोधण्याचा प्रयत्न अनेकांनीं, अनेक प्रकारे केला, परंतु 'पंडितजींनंतर" हा विचारच करायला कुणी तयार नव्हतें. पण अखेर मृत्यूनें दायित्व काँग्रेसवर व पर्यायानें देशावर टाकलें. नेतृत्वाच्या ह्या शर्यतीची नांदी पंडितजी वारले त्याच दिवशीं म्हटली गेली. आणि आतां त्या प्रश्नाचें उत्तर निश्चित झालें आहे. मोरारजी देसाई, नंदा, जगजीवनराम ह्यांनीं त्या रेसमधून निवृत्ति पत्करली आणि **'लालबहादुर शास्त्री'** असें एकमेव उत्तर वरील प्रश्नाचें मिळालें आहे. लोकशाहीमध्ये असल्या शर्यतींत भाग घेण्याचा नैतिक अधिकार प्रत्येकालाच असतो. त्यामुळें मोरारजी देसाई व जगजीवनराम यांनीं 'कौल' मागणें यांत गैर कांहींच नव्हतें. पण पंडितजींच्या नंतर एकात्म शक्तीनें उमें राहणें अगत्याचें होते. एकमतानें निवड ही लोकशाहींतही शक्य असते. आणि तशी ती घडली हें उचित झालें. यांत राजकारण पुष्कळ झालें. 'कारवाया' शब्द वापरण्याइतपतही झाल्या. डावे उजवे वादही मदतीला धावले. काँग्रेसच्या मोठेपणाचा एका रात्रींत साक्षात्कार होऊन



अरुणाबाई असफअली काँग्रेसमध्यें आल्या. अशोक मेहतांनी निश्चयी पाऊल टाकलें आणि नव्या समाजवादी पक्षांतली थोडीशी हवा काढून घेतली. त्यांच्या मागोमाग आतां कांहीं लाल-पांढरे लोक आपल्या लाल टोप्या फेकून देतील. पण ह्या सार्‍या गोष्टी घडत असल्या आणि त्या कांहींशा अपरिहार्य असल्या तरी राष्ट्राचे नेतृत्व ना. लालबहादुर शास्त्री यांच्याकडे गेलें आहे. ह्या गोष्टीचा आनंद इतका मोठा आहे•की ह्या घटना अखेर गौण महत्त्वाच्या ठरतात. लालबहादुर शास्त्री यांचें व्यक्तित्व असें आहे कीं, त्यांच्या ह्या विजयानें सार्‍यानाच आनंद झाला आहे. विविध मतमतांतरे, लोकशाहींत गृहित धरावीच लागतात—लालबहादुर शास्त्री यांना पंडितजींनी परत मंत्रीमंडळांत बोलावलें. काश्मीरमधील हजरतबाल प्रकरणीं त्यांच्यावरच संपूर्ण भिस्त टाकली. त्यानंतर राष्ट्रकुल पंतप्रधानांच्या परिषदेलाही ते शास्त्रीजींना बरोबर घेऊन जाणार होते या सार्‍या गोष्टी बोलक्याच होत्या ! लोकशाहीवर पंडितजींचा फार विश्वास होता. **"आपला वारस त्यांनीं नेमायला हवा"** म्हणणारे पर्यायानें सरंजामशाहीला तारक अशीच सूचना करीत होते, हें पंडितजींना ठाऊक होते. आणि देशाची चिंताही त्यांना वाटत होती. त्यामुळें त्यांनीं आपला 'वारस' नेमला नाहीं. पण सूचित मात्र केला. गांधींनी नेहरूंना कधीं प्रत्यक्ष 'वारस' म्हणून संबोधले नाहीं. पण त्यांनीं नेहरूंचें व्यक्तित्व घडविलें—सजविलें मात्र त्याच पद्धतीनें! शास्त्रीजींच्या बाबतींत पंडितजींनी हेंच केलें आणि लोकशाहीनिष्ठ नेहरूंनीं हें केलें हेंच संयुक्तिक होय असें मला वाटतें. हा निर्णय घेण्यांत कामराज यांचा वांटा फार मोठा आहे म्हणतात. तसेंच स्पर्धकांचाही वांटा मोठा आहे असें मला वाटतें. मोरारजी देसाई यांनीं मात्र हा निर्णय मनापासून घेतला आहे असें जाणवत नाहीं. कडु गोळी म्हणूनच त्यांनीं हें पत्करलेलें दिसतें. पंडितजींच्या मृत्यूनंतर वास्तविक एक नवें पर्व घडायला हवें होतें. पंडितजींचें यश (आणि अपयशही) त्यांचें स्वतःचें असें होतें. नंतर येणार्‍या माणसांना स्वतःची पुण्याई उभी करावी लागेल. निर्नायकी, फितुरी, अराष्ट्रीय शक्तींचा उठाव—अंतर्गत फूट ह्या सार्‍या धोक्यापासून वांचविण्यासाठीं एक पक्षातीत सहकार्य भावना उत्पन्न होणें अगत्याचें आहे. सर्व राष्ट्रवादी शक्ति एकत्र आल्या तर एक नवा भारत घडूं शकेल. शास्त्रीजींना एक फार मोठा लाभ घेतां येण्यासारखा आहे. त्यांच्या जवळ सौजन्य आहे, ऋजुता आहे. शांत व संयमी व्यक्तित्व त्यांना लाभलें आहे. 'अजातशत्रु' शास्त्री








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ग्रह, पूर्वग्रह न मानणारे आहेत. श्रेष्ठ चारित्र त्यांना लाभलें आहे. त्यांची राष्ट्र-निष्ठा संशयातीत आहे. डावे–उजवे वादाचा डाग त्यांना लागलेला नाही. गेल्या सोळा वर्षांचा इतिहास त्यांच्याच समोर घडलेला आहे. पाकिस्तान व चीनची समस्याही त्यांनीं पाहिली आहे. हिन्दुस्थानांत आपले कोण आणि परके कोण, ढोंगी कोण आणि खरें कोण हेंही त्यांनीं पाहिलें आहे. अशा ह्या पार्श्वभूमीवर विविध पक्षांचें सहकार्य घेऊन राष्ट्रीय प्रश्न सोडविण्यावावत त्यानीं पावलें टाकलीं पाहिजेंत. चव्हाणांनी महाराष्ट्रांत हें यशस्वीपणें करुन दाखविलें ! मग शास्त्रीजींना काय अशक्य आहे ?

राजकारणांत 'व्यवहार' ला आतां मोल आलें पाहिजे.

---

# महाराष्ट्राचा जॉन्सन गेला-

**पंडित** नेहरू गेले. भारताचें व जगाचेंही एक प्रकारचें नुकसान झालें. महाराष्ट्र त्या दुःखांतून सांवरतो न सांवरतो तोंच त्याला आणखी एक मोठा आघात सहन करण्याची पाळी आली. तो आघात साहित्याच्या, भाषेच्या वाबतींतला होता. व्युत्पन्न भाषा-पंडित प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांच्या मृत्यूचा तो आघात होता. तो आघात इतकासा अकल्पित नसला तरी मृत्यूशीं चिवटपणें झुंज देत वारंवार उभे राहिलेले नानासाहेव इतक्या लवकर मूकपणें निघून जातील अशी मात्र कल्पना नव्हती. गेलें वर्षभर जवळ-जवळ त्यांची प्रकृति नादुरुस्तच होती. कांहीं महिने तर ते अंथरुणालाच खिळून होते. पण अंथरुणावर रुग्ण म्हणून पडून राहिलेल्या ह्या भाषापंडिताची बुद्धि आणि विनोद–बुद्धि कायम होती. त्या काळांतही बुद्धीचीं कामें ते करीतच होते. साहित्यावर, शब्दांवर, शब्दांच्या सामर्थ्यावर त्यांची अपार श्रध्दा होती. भाषा आणि इतिहास हे दोन विषय त्यांच्या श्रद्धेचे, व्यासंगाचे विषय होते. रसाळपणें, विद्यार्थ्याला विश्वासांत घेऊन हे विषय शिकवावेत नानांनीच. भाषाशास्त्रा-सारख्या अतिशय रसाळ भाषेंत, स्वतः हंसत व इतरांनाही हंसवीत, विश्वासांत घेत. लौकिक, व समर्पक अशीं उदाहरणें देऊन नाना वर्गांत शिकवीत. त्यांना वर्गांत शिस्त लागे. पण शिस्तींत कडवटपणा नव्हता. अमानुषता नव्हती.

नानांचें व्यक्तित्वच मुळीं एका चिंतकाचें होतें. अभ्यासकाचें होतें–पंडिताचें होतें. त्यांत विचिकित्सा अधिक असे. सनावल्या त्यांच्या तोंडांत होत्या, त्या हृदयांतल्या श्रध्देचा तो विषय होता म्हणून ! मागें साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष झाले तेव्हां दादरला बऱ्याचशा साहित्यविषयक व सांस्कृतिक कार्य करणाऱ्या संस्थांचें वतीनें त्यांचा सत्कार करण्यांत आला. आचार्य अत्र्यांपासून ते दादरच्या लहान कार्यकर्त्यापर्यंत साऱ्यांनीं नानांच्या स्नेहपूर्ण, रसाळ, लोभस, अजातशत्रु वृत्तीचा गौरव केला. तेव्हां संकोची नानासाहेव गंहिवरले होते. अनेक कटु आघात त्यांनीं झेलले. पण ते अश्रध्द झाले नाहींत वा समाजावावत त्यांनीं कटुता धारण केली नाहीं. पंडित होते पण पंडिती अहंकार त्यांच्या जवळही फिरकला नाहीं. ज्ञानी होते पण ज्ञानाचा दर्प नव्हता. त्यांच्या "कृष्णा कांठची माती" ह्या आत्मचरित्रांत त्यांच्या व्यक्तित्वाची जडणघडण कशी संघर्षात्मक रीतीनें झाली तें त्यांनीं मोकळेपिणानें लहिलें आहे. त्यांनीं कधीं 'मोल' मागितलें नाहीं पण 'मूल्यें' जपली. स्नेह जपला, मित्र परिवार जपला. नानांच्या गोष्टीवेल्हाळ व विनोदी स्वभावांतूनच हें अपरिहार्यपणें घडत गेलें. लौकिक अर्थानीं नानानीं यशस्वीं संसार केला व वाङमयाच्या, भाषेच्या व इतिहासाच्या क्षेत्रांतला 'संसार' तर खूपच थाटानें, 'श्रीमंती'त केला. भाषा पंडित असूनही अनलंकारी भाषा लिहिणारा, देशस्थी अघळपघळपणा हें धन वाळगणारा व स्नेहाची श्रीमंति लाभलेला हा व्युत्पन्न पंडित यापुढें रस्त्यांत, सभास्थानीं वा कुठेंही दिसणार नाहीं ही खंत मनांत काहूर उठविते. पण अखेर मृत्यूनें त्यांच्या ह्या 'यशस्वी' जीवनावर पडदा पाडला आहे. हंसरे बोलके नाना मूक झाले आहेत. नानांना मूक मनानें पण अंतःकरणापासून ही श्रध्दांजलि अर्पण करतों.

**––सारस्वत**

(पृष्ठ ६० वरून)

वरुन होत असलें तरी त्यामुळें मूळ कलेचें मोल कांहीं कमी होत नाहीं. मर्ढेकरांची नक्कल झाली, गाडगीळांच्या शैलीचें भ्रष्ट अनुकरण झालें. गडकरी–माटे–अत्रे यांच्या शैलीनें कथा–नाटकें लिहिलीं जाऊं लागली म्हणून 'कला' हीण ठरत नाहीं. अखेर ह्या असंख्य अपुऱ्या प्रयत्नांतूनच कलेचा, विकास व प्रगति होत असते ! 'वटाटयाची चाळ ! मी पहिल्या दिवशीं पाहिली. त्यानंतर मी तिच्या पंचवीसाव्या प्रयोगालाही गेलों होतों. मला फरक जाणवला. (चांगल्या वाजूनें) चिंतनशील कलाकाराची कला नेहमींच उत्क्रान्त होत असते. आत्मटीकेंतून कलेचा कस वाढत जात असतो.– '**वन मॅन शो**' नें मराठी रंगमंचाचें पाऊल पुढें पडलें आहे. नाटकांतल्या विविध प्रयोगांपैकींच तो एक मानला जायला हवा. अनेक प्रयोगांतूनच अखेर खऱ्या कलेची नाडी हातीं लागण्याची शक्यता असते. एकपात्री प्रयोगांत ज्या उणीवा राहातात त्या व्यवतीला पडणाऱ्या मर्यादांच्या स्वरूपाच्या असतात. पु. ल. दे. च्या 'असा मी' मधल्या कांहीं असामी आपल्याला 'चाळींत' भेटतात. राजुरकरांच्या व्यक्ति 'चाळींत' भेटतात. कारण ती मर्यादा अखेर माणसाची असते. कलेची नव्हे ! अभिनयावावतही असेंच म्हणतां येईल. गंभीर भागांत देशपांडे कमी पडतात.– कारण माणसाचा म्हणून पिंड असतोच कीं ! पण देशपांडे चिंतनशील, प्रयोगशील आहेत. त्यामुळें त्यांच्या कलेंत नवनवोन्मेष दिसतो. ती सहा हिरवीगार, आल्हादक, चिरनव वाटते. एकाच प्रयोगांत फार मोठचा 'जगा' चें दर्शन घडविणाऱ्या ह्या कलेची साधना करणाऱ्यांचें योग्य मूल्यमापन व्हावें. कुठलीही खरी कला दुसऱ्या कलेला पूरक असते–मारक नव्हे ! एकपात्री प्रयोगाकडे अधिक–साक्षेपानें पाहिलें गेलें पाहिजे असें वाटतें.

**—अभिनवगुप्त**

●●●




अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



## एक पात्री प्रयोग–

**एक** पात्री प्रयोग (वन् मॅन शो) आतां स्थिरावले आहेत. केवळ नवीन टूम म्हणून त्याचें कौतुक करायचा काळ आतां संपला आहे. त्या प्रयोगाचें 'प्रयोग' म्हणून मूल्यमापन करण्याची वेळ आतां आली आहे. नाट्य म्हणून, अभिनय म्हणून, एक लिखित वाङ्मयप्रकार म्हणून, ह्या प्रयोगासंबंधीं कांहीं मोकळेपणानें बोललें तरी आतां चालण्यासारखें आहे. त्यांतल्या अस्सल आणि नक्कल असलेल्या प्रकारासंबंधींही कांहीं चर्चा करायला आतां हरकत नाहीं. मराठी नाटकाला ह्या प्रयोगामुळें जें कांहीं महत्त्व लाभलें असेल त्याचेंही नेमकें स्वरूप शोधून काढायला आतां हरकत नाहीं. आतां नुसतेंच बरें-किंवा नुसतेंच वाईट, भिक्कार, टाकाऊ असले शेरे देण्याऐवजीं 'बरें तें बरें' व 'वाईट तें वाईट' म्हणून म्हणून टाकायला हरकत नाहीं.

हें सारें सुचण्याचें कारण असें कीं, मध्यंतरी पु. ल. देशपांडे यांनीं त्यांना नवा एक पात्री प्रयोग रसिकांना सादर केला, त्यावेळी बऱ्याच जणांनीं त्या प्रयोगाबाबत व एकूण 'ह्या' प्रयोगाबाबत जें मतप्रदर्शन केलें त्यांतूनच ही चालना मिळाली. एक पात्री प्रयोग हा नाट्यप्रकार मराठीला नवीन असला तरी जागतिक रंगमंचाला तो नवीन नाहीं. मराठींत जे कांहीं प्रयोग झाले त्यांत देशपांडे व सुहासिनी मुळगांवकर यांचेंच नांव प्रामुख्यानें घ्यावें लागेल. त्यानंतर अनेकांनीं अनेक प्रयोग केले. सुहासिनीबाईंच्या पावलावर पाऊल टाकून **'शारदा'** रंगमंचावर आली. तर **"नमुनेदार माणसं"** घेऊन राजुरकरांनीं, पुरुषोत्तम वाळ, वि. र. गोडे यांनीं पु. ल. देशपांडे यांनीं 'मळलेली पाऊलवाट चालण्याचा प्रयत्न केला. त्या त्या प्रयोगासंबंधीं आज कांहींहीं बरें वाईट लिहिण्याचा आज उद्देश नाहीं. त्याचें कारण असें कीं, यापूर्वी तसें मी लिहून टाकलें आहे. आज त्या प्रयोगांपेक्षांही ह्या नाट्यप्रकारासंबंधींच कांहीं लिहिण्याचा मानस आहे.

'असा मी' नंतर बऱ्याच जणांनीं ह्या नाट्यप्रकाराबाबत झोड उठविली. त्याला मुळांतच नांवें ठेवून नाकें मुरडली. हें नाट्यच नव्हें. ह्यानें नाटकाची प्रगति खुंटेल वगैरेही अभिप्राय व्यक्त करण्यांत आले. विशेष असें कीं, ह्या प्रकाराला कांहीं योजना असावी असेंही वाटायला लावण्याइतपत ती पद्धतशीर टीका प्रसिद्ध झाली. त्या टीकेला उत्तर देण्याचा हा प्रयत्न नाहीं. पण केवळ मूल्यमापन हाच हेतु आहे.

### एक पात्री प्रयोगाची चांगली बाजू

(१) एक पात्री प्रयोग हीहि एक कला आहे. पु. ल. म्हणतात त्याप्रमाणें 'बहुरूपी' गुणी माणसाचें, तें कलात्मक दर्शन आहे. आधीं तीं विविध रूपें एका माणसाच्या मनांत साकारणें. त्यानें त्यांना शब्दरूप देणें आणि मग स्वतःच्या अंगच्या गुणांच्या (अभिनयादि) सहाय्यानें त्या व्यक्ती रंगमंचावर सजीव करून दाखविणें ही गोष्ट वाटते इतकी सोपी नाहीं. सुहासिनी मुळगांवकर "सौभद्र, मानापमाना"तल्या विविध व्यक्ती जेव्हां सजीव करून दाखवितात तेव्हां त्यांत एका अभिनेत्रीच्या श्रेष्ठ अभिनय गुणांची प्रचीति येते. लेखकाचें व्यक्तित्व जसें संपन्न असेल तसें त्याला विश्वरूप दर्शन घडेल. तसेंच अभिनेत्याचें व्यक्तित्व जर संपन्न असेल तरच त्याला ह्या विश्वरूपाचे दर्शन घडविणें शक्य होईल.

> **दीपावली बुद्धिबळ क्र. ८ चे**
>
> **अधिकृत उत्तर या अंकांत देऊं शकलों नाहीं तें पुढील अंकांत प्रसिद्ध होत आहे.**
>
> **–क्षमस्व**

त्या प्रयत्नांत मोठी साधना आहे. अधिक कसब आहे. विविध व्यक्तींच्या स्वभाव विशेषांचें रसायन बेमालूम झालें, तरच त्या विश्वरूपाचा साक्षात्कार प्रेक्षकांना घडेल. पु. ल. देशपांडे "बटाट्याच्या चाळींत" व 'असा मी'त हें रसायन बेमालूम झालें असल्याचा प्रत्यय देतात. विनोदी नट, खलनायक, इत्यादि भूमिकांचे मुखवटे घालून पुष्कळसे नट वावरतांना दिसतात. पण एक पात्री कार्यक्रमांत क्षणाक्षणाला मुखवटे बदलण्याची किमया कलावंताला करावी लागते. भूमिकेशीं समरस होण्याइतका वेळ त्याला नसतो. आणि झाल्याशिवाय त्याला गत्यंतरहि नसते. तारेवरची कसरत त्यांत असते. एका फार मोठ्या परीक्षेंतून तो जात असतो. फार नाजुक अशा, सूक्ष्म अशा, तरल अशा भाव-छटा त्याला एखाद्या सर्कशीच्या रिंगमास्टरच्या आदेशानुसार सादर कराव्या लागतात. कुठल्याही साधनांशिवाय साधनांचा आभास उत्पन्न करावयाचा असतो. स्वतःजवळ कांहींहीं नसतांना अभिनयाच्या श्रीमंतीवर तीन तासांच्या करमणुकीचा 'सौदा' करावयाचा असतो. त्या श्रीमंतीवरच तो 'श्रीमंत' ठरणार असतो (होणारही असतो) एक अमर्याद जग पाहणें व तें केवळ मर्यादित शक्तींनिशी (नेपथ्यादि) पण केवळ अभिनयाच्या द्वारें तें प्रेक्षकांपर्यंत नेऊन पोहोंचविणें हें काम मर्यादित शक्तीचा माणूस करूं शकणार नाहीं. अभिनयाचें लेणें नसेल, लेखणी समर्थ नसेल, अनुभव समृद्ध नसेल, व्यक्तित्व संपन्न नसेल तर ही किमया करूनच दाखवितां येणार नाहीं. कलाविषयाशीं कलावंताचें तादात्म्य झालें तरच हें लेखकाला पडलेलें स्वप्न साकार होईल. रंगमंचाला आवश्यक असलेल्या सर्व गुणांचें दर्शन, कुठलीही साधनें हाताशीं नसतांना, प्रेक्षकांना घडविणें हें कलावंताचें एकमेव कार्य असतें. आणि पु. ल. देशपांडे यांचें हें यश म्हणूनच नजरेंत भरतें. सुहासिनी मुळगांवकरांचा गौरव म्हणूनच केला जातो. कुठल्याही चांगल्या प्रयत्नाची, कला प्रकाराची नक्कल होणें हें मानवी स्वभावाला

(पृष्ठ ५९ वर)




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# तुमच्यां केशसौंदर्यासाठीं नवें गुणगान
# स्वस्तिक पर्फ्यूमड़ कॅस्टर ऑईल

**तुमचे केस रेशमासारखे मऊ आणि सुंदर रहातात.**



स्वस्तिक हेअर स्टाईल
'मयूर'

थोडेंसें स्वस्तिक पर्फ्यूमड् कॅस्टर ऑईल हलकेंच केसांना लावा. केशभाराचे तीन भाग करून मधला केशभार डौलदारपणें एका बाजूला गुंडाळून घ्या. नंतर उरलेला केशभार चित्रांत दर्शविल्याप्रमाणें त्यावरून लपेटा अन् योग्य त्या प्रसाधनांनीं केशरचना सुशोभित करा.



**स्वस्तिक ऑईल मिल्स लिमिटेड, मुंबई.**












राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

